# मधुवचनमाला.

हें

लहानांपासून थोरांपर्यंत
सर्व स्त्रीपुरुषांच्या मनावर
धर्म, नीति, सदाचार व व्यवहार
यांचा
पूर्ण ठसा उमटविणारें लहानसें
पुस्तक

हरि गंगाधर पतकी
यांनीं
नेक पुस्तकांच्या, आधारें तयार करून

वजी श्रीधर गोंधळेकर यांचे जगद्धितेच्छु छापखा-
न्यांत छापून प्रसिद्ध केलें.

शके १८२८ पराभवनामसंवत्सरें.


---



---


किंमत ०१० आणे.

# प्रस्तावना.

“ मनोरंजनापेक्षां ज्ञान संपादनाचाच हेतु मनांत धरून केलेलें पुस्तकाचें वाचन हें अत्यंत श्रेष्ठ व उपयोगाचें वाचन होय. कारण सत्कल्पनांचा व सुविचारांचा मनांस प्रेरणा करणारीं पुस्तकें हींच मनुष्याची खरी सुधारणा करितात. ”

सर जॉन लबॉक.

हें पुस्तक माझ्या गेल्या आठ दहा वर्षांच्या वर्तमानपत्रांतून लिहिण्याच्या व्यवसायाचें फळ होय. करमणूक, जगद्धितेच्छु, ज्ञानचक्षु यां सारख्या लोकमान्य वर्तमानपत्रांतून लेख लिहिण्याचे सुप्रसंग मला लाभले ह्मणूनच माझा वाचनाचा व्यासंग विशेष होऊन त्याच्या योगानें प्रस्तूतचें हें लहानसें पुस्तक माझ्या हातून यथामति रचिलें गेलें. यांत माझें स्वतःचें असें कांहीं नाहीं ह्मटलें तरी चालेल. कारण माझा मूळचा उद्देश इंग्रजींतील “ Familiar Quotations. Maxims and Reflections ” अशा पुस्तकां सारखे मराठींत थोर व विद्वान लोकांचे विचार एकत्र गोळा करून एखादें लहानसें पुस्तक तयार करावें हा होता. त्याप्रमाणें मी इंग्लिश, संस्कृत, मराठी, हिंदी आदिकरून भाषेंतील चांगलीं चांगलीं नामांकित पुस्तकें जरूर लेवढीं वाचून त्यांत जे जे ह्मणून उत्तमोत्तम विचार माझ्या वाचण्यांत आले त्या सर्वांचा या पुस्तकांत मी समावेश केला आहे. शिवाय एडिटर या नात्यानें अभिप्रायार्थ

येणाऱ्या लहान मोठ्या पुस्तकांचें परीक्षण करण्याचे व पत्राला मोबदला म्हणून येणाऱ्या इंग्रजी, मराठी, हिंदी गुजराथी वर्तमानपत्रांचें व मासिक पुस्तकांचें वाचन करण्याचे प्रसंग माझ्या लेखनव्यवसायामुळें मला प्रत्यहीं लाभत असल्या कारणानें हें पुस्तक तयार करण्याचे कामीं मला त्याही वाचनाची पुष्कळच मदत झाली असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. बालबोध, विविधज्ञानविस्तार, श्रीसरस्वती मंदिर, ग्रंथमाला आदिकरून विद्वान लोकांनीं चालविलेलीं वजनदार मासिक पुस्तकें व त्याचप्रमाणें श्री सयाजीविजय पुस्तकमाला, मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला, पावगीकृत भारतीय साम्राज्य पुस्तकमाला, दाभोळकर पुस्तकमाला आदिकरून मालांपैकीं कांहीं कांहीं चांगलीं पुस्तकें मीं मुद्दाम वाचून त्यांत जे मला घेण्यासारखे उत्कृष्ट विचार आढळून आले तेही थोडेबहुत या पुस्तकांत मी संग्रहित केले आहेत. एकंदरींत ज्या साधनांच्या सहाय्यानें हें प्रस्तुतचें पुस्तक मीं रचून तयार केलेलें आहे त्या सर्व साधनांबद्दल अंतःकरणपूर्वक कृतज्ञः बुद्धि दर्शवून आणि त्या इंग्लिश, संस्कृत, मराठी ग्रंथकारांचे, मासिकपुस्तककारांचे, मालाकारांचे, व वृत्तपत्रकारांचे सप्रेम आभार मानून मी हे जे त्यांच्या सुविचाररूपी सुवर्णकणांतून वेंचून घेतलेले उत्कृष्ट बावनकशी सोन्याचे कण ते या लहानशा पुस्तकांत सांठवून संपूर्ण महाराष्ट्र भाषाभिज्ञजनांपुढें मोठ्या प्रेमबुद्धीनें सादर करीत आहे.

याशिवाय हें पुस्तक रचण्यांत माझा आणखी असा

एक उद्देश आहे कीं, अलीकडे शाळांतून तरुण मुलांना धर्मनीतीचें शिक्षण देण्याविषयींची आवश्यकता विशेष भासूं लागत चालली आहे. तेव्हां अशा वेळीं धार्मिक व नैतिक विचार त्यांच्या पुढें ठेवून स्वशक्त्यनुसार त्यांना धर्म, नीति, सदाचार व व्यवहार यांतील उदात्त तत्त्वांची ओळख करून द्यावी असें मनांत आल्यावरून मीं अनेक ग्रंथांच्या आधारानें हा अल्पसा प्रयत्न केला आहे. तेव्हां माझ्या या नूतन अल्पमति कृतिला ईशकृपेंकरून यश येवो व या पुस्तकाच्या श्रवणवाचनानें मन उज्वल होऊन तरुण पिढीच्या मनांत धर्मनीतीची जागृती राहो अशी मी अंतःकरणपूर्वक इच्छा करितों. असो.

शेवटीं ही प्रस्तावना पूर्ण करण्यापूर्वीं ज्या उदार, परोपकारी, रसिक व विद्याप्रिय सद्‌गृहस्थांनीं मला हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचे कामीं मोठ्या प्रसन्न चित्तानें व कृपादृष्टीनें द्रव्यद्वारा मदत केली त्या थोर उदारधी श्रीमंत सद्‌गृहस्थांच्या नांवांचा उल्लेख या ठिकाणीं केल्या शिवाय व त्याबद्दल कृतज्ञता प्रगट केल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं. ते थोर गृहस्थ सोलापूर येथील प्रसिद्ध सावकार श्रीमंत रा. सा. मल्लाप्पा बसाप्पा उर्फ आप्पा साहेब वारद हे होत. त्यांच्या औदार्याविषयींचा लौकिक सर्व विश्रुत आहेच. तेव्हां त्यास साजेल असेंच त्यांच्याकडून मजसारख्या होतकरू ग्रंथकारास द्रव्याचें सहाय्य मिळालें याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. तसेंच येथील जगद्धितेच्छु छापखान्याचे मालक श्रीमंत रा. रा. रावजी श्रीधर उर्फ

रावसाहेब गोंधळेकर यांचे चिरंजीव श्री० रा० रा० केशव रावजी गोंधळेकर जे हल्लीं सदहू संस्थेच्या म्यानेजरचें काम मोठ्या दक्षतेनें पहात आहेत त्यांनीं स्नेहबुद्धीनें पुस्तक छापून देण्याचे कामीं मला जी विशेष सवलत दिली तीबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहें.

पुणें भाद्रपद शुद्ध
पराभवनामसंवत्सरे
शके १८२८.



हरि गंगाधर पतकी
पुस्तक कर्ता.

# मधुवचनमाला.

[Phylosophical & Religious.]

## तात्त्विक आणि धार्मिक.

( १ )

परमार्थाशीं परिचय होणें हें ज्ञानप्राप्तीचें अत्यंत श्रेष्ठ फल होय.

( २ )

परमेश्वराचे ठिकाणीं अनन्यभक्ति व प्राणीमात्राविषयीं प्रेम हींच धर्माचीं मुख्य तत्वें होत.

( ३ )

ईश्वरभक्तीची अभिरुचि मनुष्यास बालवयांत लागलेली उत्तम. कारण त्या वयांत मनुष्याच्या मनांतले विषयविकार प्रबल झालेले नसतात.

( ४ )

सत्पुरुष अंतर्निष्ठ असतो; इतर जन बहिर्निष्ठ असतात. सत्पुरुषांना संतोष आपल्यांतच आहे असें वाटतें. इतरांस संतोष दुसऱ्याकडून मिळवावा लागतो.

( ५ )

मनुष्य हा या सृष्टीचें केवळ प्रतिबिंब असल्यानें विश्वांतील सर्व तत्वांचा याच्यांत संग्रह झालेला आहे. अनंत विश्वाचें ज्याला सूक्ष्म अवलोकन करणें असेल त्यानें प्रथम मनुष्याचें सूक्ष्म अवलोकन करावें.

( ६ )

आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक या तिहींचा लाभ शरीरसंपत्ति, वाचासंपत्ति व मानसिक संपत्ति या तीन संपदांच्या योगें होतो.

( ७ )

शरीरसंपत्ति ह्मणजे शरीर सशक्त, निरोगी व अति काटक असणें ही होय; वाचासंपत्ति ह्मणजे विश्वसंबंधीं ज्ञानाचा संचय व विस्तार करण्याची उत्तम शक्ति असणें ही होय; व मानसिक संपत्ति ह्मणजे यम-नियमादि आठ सामान्य उपायांनीं चिच्छक्तीचा पूर्ण विकास करून घेणें होय.

( ८ )

चित्तवृत्ति जर प्रसन्न नसेल तर ममत्व, विवेक व इच्छा हीं उदासीन स्थितींत असतात.

( ९ )

मनुष्यानें आपल्या इच्छांची तृप्ति होण्यापुरतें विश्वाचें ज्ञान संपादन करणें याचें नांव मोक्ष.

( १० )

आत्मा स्थिर, शांत व विकारातीत आहे. आणि मन अस्थिर, चंचल व विकारपात्र आहे. ह्मणून साधुसंत मनास बोध करितात. आत्म्यास करीत नाहींत.

( ११ )

धर्मतत्त्व अत्यंत गहन आहे. तें मोठमोठ्यांसही गम्य नाहीं; परंतु कर्तव्यतत्त्व उघड आहे. अत्यंत सुगम आहे. त्यांत पुष्कळ धर्मतत्त्वांचा समावेश होतो.

( १२ )

मनुष्यानें जन्म घेतल्याचें सार्थक ह्मणजे चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ती करून घेणें हें होय.

( १३ )

धर्माची संपादणी अशी करावी कीं, त्यापासून अर्थप्राप्ती होईल; अर्थाची संपादणी अशी करावी कीं, त्यापासून मनोरथसिद्धि होईल; आणि मनोरथ-सिद्धि तरी अशा रितीची करावी कीं, त्यापासून मोक्ष-प्राप्ती होईल.

( १४ )

लहान मुलांचे आत्मे पवित्र, निर्मळ व मनोविकारांपा-सून अलिप्त असतात.

( १५ )

जगामध्यें जसे इतर प्राणी परतंत्र किंवा परिस्थि-तिबद्ध आहेत तसाच मनुष्यप्राणीही परतंत्र व परिस्थि-तिबद्ध आहे. त्यानें मी स्वतंत्र आहें अशी प्रौढी कधींच मिरवूं नये. कारण माया, मोह, लोभ, ममता, लोकाप-वाद, व जनलज्जा हीं मनुष्याचीं अदृश्य बंधनें होत.

( १६ )

मनुष्याचें मन हेंच स्वतः मनुष्य आहे; आणि त्याच्या बंधनास किंवा मुक्तीस कारण मनच आहे.

( १७ )

प्रपंचाचा ताप टाळण्याचा उत्तम उपाय वैराग्य तर खरेंच; पण प्रपंचामध्यें दुर्वासना जिंकून इं-द्रियदमन करून जर सगळे व्यवहार केले तर त्या सारखा दुसरा पुरुषार्थ नाहीं.

( १८ )

ज्याप्रमाणें वाळूवर उमटलेलीं पावलें त्यांच्या आकृतीवरून तीं माणसाचीं आहेत कां पशूंचीं आहेत हें ओळखितां येतें, त्याप्रमाणें आकाशांतील तारांगणाचें वैभव, जगाचा अतर्क्य विस्तार, व महासागराच्या अगण्य लहरी येवढ्यांवरून ईश्वराचें अस्तित्व मनांत चांगलें उभें राहतें.

( १९ )

अनाथ व निराश्रित मनुष्यें विपत्तीनें व दुःखानें गांजलेलीं पाहून त्यांचा समाचार घेणें व त्यांस यथाशक्ति मदत करणें आणि जगामध्यें वागत असतांही अगदीं निर्मल व निष्कलंक राहणें हाच खरा व शुद्ध धर्म होय.

( २० )

ज्या माणसांचे ठिकाणीं परमार्थाविषयीं पराङ्मुखता विशेष प्रगट असते तीं रजोगुणी माणसें होत.

( २१ )

जसें शरिराचें पोषण उत्तम अन्न सेवन केल्यानें होतें, तसें आत्म्याचें पोषण सौंदर्य, शहाणपणा व सौजन्य इत्यादि दैविक गुणांनींच होतें. त्याला दुर्गुणांचें खाद्य दिलें असतां तो शुष्क होत जातो.

( २२ )

मानसिकशक्तींत दोन प्रमुख शक्तींचा आंतर्भाव होतो. एक विवेकशक्ति व दुसरी कल्पना शक्ति. पहिल्या शक्तीच्या योगानें मनुष्याला सत्यासत्यांचें विवेचन करितां येते. हिचा उत्कर्ष बहुधा तत्त्वज्ञांच्या

ठायीं आढळून येतो. व दुसऱ्या शक्तीच्या योगानें कल्पनेच्या आधारें वास्तव व अवास्तव पदार्थांचें यथावत् वर्णन करण्याची शक्ति येते. हिचा उत्कर्ष बहुतकरून कवींच्या ठायीं आढळून येतो.

( २३ )

स्वाहिताकडे फारसें लक्ष नसावें, आणि क्रोधादि मनोविकारांस वश होऊन विचार न करितां भलतें पाहिजे तें करावें असें तमोगुणाचें सामान्य लक्षण आहे.

( २४ )

जे स्वभावतः निरिच्छ असून यदृच्छेनें जें काय प्राप्त होईल त्यावर कालक्रमणा करितात व जे नेहमीं असलेल्या स्थितींत पूर्ण समाधान मानितात ते खरे तत्त्वज्ञ होत.

( २५ )

रज आणि तम या दोहोंचें दमन हाच सत्व गुण होय. सत्व गुणी मनुष्यामध्यें खरें मनुष्यपण दृश्यमान होतें. आणि सत्व गुण साधणें ही एक प्रकारची तपश्चर्या आहे.

( २६ )

या जगांत प्राणिमात्राला खरा आधार एका परमेश्वराशिवाय दुसरा कोणाचाही नाहीं. हा संपूर्ण विश्वविस्तार ज्याच्या इच्छामात्रेंकरून अगदीं सुयंत्रितपणें चाललेला आहे, तो जगच्चालक प्रभूच सर्व स्थावरजंगम वस्तूंचें पालन करितो.

( २७ )

मनुष्याच्या अंतःकरणाला लागलेली तहान परमेश्वरभक्तिखेरीज भागत नाहीं.

( २८ )

सुखाचा संबंध देहाशीं आहे, कीर्तीचा मनाशीं आहे, सुखानें समाधान शरीरास होतें व कीर्तीनें अंतःकरणास होतें.

( २९ )

आचरणांत द्वैत माजवून अद्वैताची इमारत रचूं पहाणें ह्मणजे शुद्ध मनोराज्य होय.

( ३० )

कर्मफलाची आशा न धरितां कर्मं करणें हीच निरपेक्षभक्ति होय. व तीच भक्ति अखंड होय.

( ३१ )

प्रवृत्तिमार्गाचें पर्यवसान स्वार्थातिरेक व परोपद्रवीपणा यांत झालें असतां व निवृत्तिमार्गाचें पर्यवसान शुष्क दैववाद व फाजील सोशिकपणा यांत झालें असतां परिणामीं त्या दोहोंपासूनही पराकाष्ठेचें नुकसान होतें.

( ३२ )

त्रिविध दुःखाच्या समुद्रांतून तरून जाण्यासाठीं ईश्वरभक्ति ही एक उत्तम नौका आहे.

( ३३ )

जगांत धर्माप्रमाणें प्रत्यक्ष आचरण करणाऱ्यापेक्षां धर्माच्या बाबतींत वितंडवाद करणारेच पुष्कळ.

( ३४ )

ज्यांत आपला स्वार्थ नाहीं व जनतेचें हित आहे तें कर्म निष्काम होय.

( ३५ )

समबुद्धीस योग म्हणतात व त्यास मुख्य आधार स्थिरबुद्धीचा आहे.

( ३६ )

पूर्णत्वाच्या पदाला जाऊन पोहोंचलेल्या मनुष्यास या जगांत परमेश्वरावांचून कांहींच दिसणार नाहीं.

( ३७ )

परमेश्वर सर्व भूतांच्या ठायीं आहे, हें मनांत आणून ज्ञानी मनुष्यांनीं सर्व प्राण्यांवर प्रीति करावी.

( ३८ )

प्रत्येकानें आपलें कर्तव्य कितीही विघ्नें आलीं तरी तें करण्याचें सोडूं नये. परमेश्वरावर सर्व भार टाकून तें करावें.

( ३९ )

सत्त्वगुण मनुष्यास ज्ञान प्राप्त करून देतो; रज मनुष्याची कर्माकडे प्रवृत्ति करवितो; आणि तम प्रमाद घडवितो.

( ४० )

दैवी संपत्तीचे लोक दुसऱ्यावर उपकार करण्याकरितां आपणास परमेश्वरानें संपत्ति दिली आहे असें मानितात.

( ४१ )

निंदा व स्तुति, संपत्ति व विपत्ति, मान व अपमान यांत खऱ्या तत्वज्ञास कांहीं सुद्धां भेद वाटत नाहीं.

( ४२ )

सत्कर्म करणारा मनुष्य कधींही दुर्गतीला जात नाहीं. तसेंच असत्कर्म करणाऱ्या मनुष्यास कधींहीं सद्गति मिळत नाहीं.

( ४३ )

जो स्वतः कोणास दुःख देत नाहीं व कोणाच्या दुःखासही कारण होत नाहीं तो आधीं परमेश्वराच्या-कृपेस पात्र होतो.

( ४४ )

आसुरी संपत्तिमान् लोक केवळ सुखोपभोग व चैन भोगण्याकरितां आपण संपत्ति मिळविली आहे असा गर्व वाहतात.

( ४५ )

जगांत कोणत्याही कार्याला मनुष्य निमित्त आहे. परमेश्वराच्या इच्छेनें तें अगोदरच झालेलें असतें.

( ४६ )

कितीहि अपराध केले असले तरी परमेश्वरास अनन्यभावें शरण गेलें असतां तो ते विसरून दया करतो.

( ४७ )

ज्या घरांत परमेश्वराचें भजनपूजन नाहीं तें घर रानपांखरांच्या घरट्याप्रमाणें समजावें.

( ४८ )

जो कोणी जी इच्छा धरून परमेश्वराची भक्ति करितो त्याची ती इच्छा तो प्रभु पूर्ण करितो.

( ४९ )

जोंपर्यंत जीवात्म्याचा व शरिराचा संबंध आहे तोंपर्यंत सुखदुःखानुभवाचें निवारण होणें शक्य नाहीं.

( ५० )

तरुण माणसाचें शील बनविण्याचे कामीं नुसत्या व्यावहारिक शिक्षणाचा कांहींच उपयोग होत नाहीं. त्यास धर्मशिक्षणाची विशेष जरूर आहे.

( ५१ )

मनोविकार अजिवात जिंकावयाचें काम सोपें आहे; पण तें आपल्या स्वाधीन ठेवून त्यांस आपल्या मनाप्रमाणें वागविणें हें काम फारच कठिण आहे.

( ५२ )

शारीरिक व मानसिक पवित्रता, संतोष, विद्याध्ययन व परमेश्वराचे ठिकाणीं एकनिष्ठा या गोष्टी आत्मोन्नतीस अत्यंत अवश्य आहेत.

( ५३ )

सकळ उन्नतींचें मूळबीज व यच्चयावत् अभ्युदयाचें अधिष्ठान केवळ धर्मच होय.

( ५४ )

धर्माचा मूळ पाया श्रद्धा होय.

( ५५ )

सत्पुरुषास आपली निंदा झाल्याचें वाईट वाटत नाहीं. तर निंदक निंदापापानें नरकांत पडेल याचें त्याला फार वाईट वाटतें.

( ५६ )

ज्ञान संपादन करावयाचें तें कोणत्याही दुसऱ्या

फलाच्या आशेनें संपादन करावयाचें नाहीं, तर ज्ञानसंग्रहांत स्वतःसिद्ध जें सुख आहे त्या सुखास्तव ज्ञान संपादावयाचें अशी ज्यांची वृत्ति बनली तेच खरे ज्ञानी जन होत.

( ५७ )

नीतीस धर्माचें पाठबळ आहे; आणि धर्माची दृष्टि नीतिदृष्टीपेक्षां अधिक विस्तृत असल्यामुळें स्वकर्त्तव्याची पूर्ण कल्पना मनुष्यास धर्मापासूनच उत्पन्न होते.

( ५८ )

सत्यवस्तुविषयीं ज्या कल्पना तें पुण्य होय; व असत्य वस्तूविषयीं ज्या कल्पना तें पाप होय.

( ५९ )

संसाराच्या त्रिविध तापापासून आपली सोडवणूक कशी होईल हा विचार नित्य ज्याच्या ठिकाणीं वास करितो त्यास मुमुक्षु असें ह्मणतात.

( ६० )

नुसते इंद्रियव्यापार बंद केल्यानें त्यांचा निग्रह होत नाहीं. आपण सांगूं तसें वागणें हाच खरा इंद्रिय निग्रह होय.

( ६१ )

मानवी आयुष्य हें एक लहानसें बेट असून तें काळ व आकाश या दोन अनंत महासागरांनीं वेष्टिलेलें आहे. त्याचें विस्तीर्णत्व व अज्ञेयत्व पाहून मन पराकाष्ठेचें थक्क होऊन जातें व कल्पनाशक्ति कुंठित होते.

( ६२ )

खरी ईश्वरप्राप्ती नुसत्या शब्दजालापासून होत नाहीं, तर धर्मशील व भक्तियुक्त अशा आचरणापासून होते.

( ६३ )

मनुष्य नाना शास्त्रांचें पठण करो; किंवा नाना दैवतांची पूजा करो; आत्मज्ञानावांचून सर्व खटपट व्यर्थ आहे.

( ६४ )

ज्ञानी पुरुषाला कर्म करण्याची जरूरी नाहीं; परंतु त्यानेंही जर कर्म निष्काम बुद्धीनें केलेंच तर तें कर्म त्याच्या पुरुषार्थसिद्धीच्या आड येत नाहीं.

( ६५ )

कर्म फलद्रूप होण्याचें ईश्वराधीन आहे. आणि कर्म करणें मानवाचें कर्तव्य आहे.

( ६६ )

कर्मफल प्राप्त होवो अगर न होवो, चित्ताचें समाधान व समता सोडून न देतां केवळ परमेश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धीनें कर्में करणें हाच खरा योग होय.

( ६७ )

अहंकार, मीपणा, हा सर्व पापाचा उगम आणि मूलद्रव्य आहे. आत्मत्याग केल्यावांचून ईश्वराशीं एकरूप होणें शक्यच नाहीं.

( ६८ )

जेव्हां जेव्हां इच्छा, कामना मार्गभ्रष्ट होते तेव्हां तेव्हां ती अहंकाराच्या कलास व इच्छेस पूर्णपणानें वश असते.

( ६९ )

मुलगा प्रपंच करण्यास योग्य झाल्यावर त्याच्या आंगावर गृहभार टाकून देऊन हळू हळू इंद्रियांच्या भोगेच्छा कमी कमी करणें व ईश्वरचिंतनांत आयुष्य घालविण्याची प्रवृत्ति ठेवणें हेंच वानप्रस्थाश्रमधर्माचें मुख्य लक्षण होय.

( ७० )

धर्मशास्त्राला आचार हा मूळ आहे.

( ७१ )

अधार्मिक आणि पापी हे प्रथम किती जरी विद्वान् किंवा धनवान् झाले तरी ते लवकरच अधर्मानें वागल्यानें दरिद्री होतात.

( ७२ )

खरें बोलणें, हिंसा न करणें, ब्रह्मचर्यानें वागणें, निष्कलंक असणें व चोरी न करणें यांसच यम असें ह्मणतात.

( ७३ )

शास्त्र माहीत नसल्यास आपले वाडवडील ज्या मार्गांनीं गेले त्या मार्गांनीं आपण जावें ह्मणजे त्यापासून मोठें कल्याण होतें.

( ७४ )

ज्यांस वेदशास्त्रांचें उत्तम ज्ञान झालेलें आहे, ज्यांचे लोभ, क्रोध इत्यादि दुष्ट मनोविकार नष्ट झालेले आहेत व ज्यांनीं निरंतर सद्सद्विचार करून आपलें आचरण पवित्र व शुद्ध राखिलेलें आहे अशा महाजनांनीं घालून दिलेल्या मार्गास धर्म ह्मणावें.

( ७५ )

चिन्हांवरून धर्म जाणावयाचा नाहीं. विहित कर्मे केल्यानें धर्माचें अर्जन होतें.

( ७६ )

मनाचे ठिकाणीं विकार उत्पन्न करण्यासारखे विषय पुढें आले असतांही तें विकार पावूं न देणें याचें नांव दम.

( ७७ )

अक्रोध, गुरु सुश्रुषा, आहार, लाघव आणि अप्रमाद यांस नियम ह्मणावें.

( ७८ )

निरंतर एका ब्रह्मचिंतनाखेरीज दुसरा निदिध्यास नसणें हें सर्वसंग परित्याग करून यथाविधि धारण केलेल्या चतुर्थाश्रम धर्माचें मुख्य लक्षण होय

---

MORAL & SOCIAL.

# नैतिक आणि सामाजिक.

( १ )

सत्य हा नीतिमत्तेचा जीव आहे; व नीति हें सगळ्या उन्नतींचें बीज आहे.

( २ )

या जगांत मनुष्यमात्रास जें काय सुख ह्मणून होत आहे तें एक सत्यापासून होत आहे; आणि जें काय दुःख म्हणून होत आहे त्यास खरें कारण असत्य आहे.

( ३ )

सत्याचें तेज कांहीं विलक्षण आहे. त्याचा अपलाप करण्याचा प्रयत्न कोणीं कितीहि जरी केला तरी तें शेवटीं बाहेर आल्याशिवाय रहात नाहीं.

( ४ )

पवित्रता हा एक परीस आहे. त्याचा स्पर्श सदोष मानलेल्या कर्मास झाला असतां तें कर्म निर्दोष होतें येवढेंच केवळ नव्हे तर तें सत्कवीस वर्णनीय वाटतें आणि साधुसंतास वंद्य होतें.

( ५ )

उद्योग करतां करतां कदाचित् विपत्ति येईल; पण आळसानें कल्याण कधींच व्हावयाचें नाहीं.

( ६ )

आळस हा मोहाचा पाळणा आहे, रोगाचें माहेरघर आहे, आयुष्य खाणारा राक्षस आहे; आणि सुखवृक्षास पोंखरणारा किडा आहे.

( ७ )

असत्कर्म करण्याची इच्छा झाली असतां लागलाच त्याचा त्याग करणें आणि सत्कर्म करण्याविषयीं मनाचा दृढ निश्चय करणें याचेंच नांव आत्मसंयमन.

( ८ )

कुटुंबांत प्रेम व विश्वास यांची व्याप्ति एक आत्मसंयमनानें होते; आणि ती व्याप्ति हेंच खरें सुख.

( ९ )

प्रयत्न व त्याची निष्फळता व पुन्हां प्रयत्न अशी झटापट जेव्हां एक सारखी चालवावी तेव्हा कोठें अखेर जयाची आशा बाळगण्याचा मनुष्यास अधिकार येतो.

( १० )

सत्कर्म हा या जगांत एक राजमार्ग आहे. असत्कर्म ही चोर वाट आहे. राजमार्गानें गेलें असतां ऐहिक व पारलौकिक सौख्य प्राप्त होतें. व चोर वाटेनें गेलें असतां इह लोकीं व परलोकीं असंख्य यातना भोगाव्या लागतात.

( ११ )

या जगांत मनुष्यांस आईबापांसरखीं पूज्य मनुष्यें दुसरीं कोणतींच नाहींत. कारण मायबापें हीं अवघीं देवाचीं स्वरुपेंच होत.

( १२ )

मनुष्यमात्राचे व्यवहार चांगल्या प्रकारचे चालण्यास व त्यांपासून त्याला सुख होण्यास ज्या अनेक मनोभावना उपयोगीं पडतात त्यांत विश्वास मुख्य आहे. विश्वासानें पारमार्थिक सौख्यहि मनुष्याला प्राप्त होतें.

( १३ )

प्रपंच हा एक प्रचंड गाडा आहे. तो चालवयासा स्त्री व पुरुष हीं दोन चाकें लाविलेलीं आहेत. तीं ज्या मानानें एकसारखीं चांगलीं असतात त्यामानानें तो गाडा चांगला चालतो. नाहीं तर मागें रेंगाळत राहतो.

( १४ )

जे खरे धर्मात्मे आहेत त्यांस पैसा दुसऱ्या करितां मिळविणें व तो दुसऱ्याकरितां खर्च करणें यांतच विशेष सुख व भूषण वाटतें.

( १५ )

जगांत आपण चांगली कृति करून तिचें भूषण दुसऱ्यास देणें आणि त्यांतच स्वतःच्या मनास आनंद मानणें हा गुण श्रेष्ठ जनांच्याच ठिकाणीं वास करितो. व त्यालाच कीर्तीविषयींची खरी निर्लोभता असें ह्मणावें.

( १६ )

संपात्ति संपादन केल्यावर नेमस्त, निरभिमान, प्रामाणिक आणि उदार असा राहणारा माणूस या जगांत विरळा.

( १७ )

मनुष्य एका संकटाशीं झुंजत असतां त्याच्या बुद्धीस व मनास त्याबद्दल श्रम पडून जो एक प्रकारचा व्यायाम मिळतो तो पुढील इतर कोणत्याही संकटाशीं तोंड देऊन झुंजण्यास व शेवटीं त्यांत विजयी होण्यास त्यास पूर्ण समर्थ करितो.

(१८)

घर हें सर्व प्रकारच्या उन्नतींच्या आरंभाचा पाया आहे. जें काय उत्तम ह्मणून आहे तें संपादावयास उत्तम स्थळ एक घरच होय.

(१९)

मनुष्यांस घर जें एक परम सुखाचें स्थान वाटतें त्यास मुख्य कारण एक प्रेम होय. कारण प्रेम हा घराचा जीव आहे.

(२०)

पुढील हेतूवर दृष्टि ठेवून सतत उद्योग करीत असतां मध्येंच जी परिस्थिति प्राप्त होईल तिच्यावर न रुसतां ती जमेस धरून जो आपल्या वर्तनक्रमाची दिशा बदलतो तोच खरा दूरदर्शी.

(२१)

ज्ञान आणि सद्गुण याच काय त्या दोन गोष्टी अविनाशी आणि निरंतर उपयोगीं पडण्यासारख्या आहेत.

(२२)

नरदेहाचा सर्वांत उत्तम उपयोग म्हटला म्हणजे परोपकार होय.

(२३)

सुदैवानें वैभव प्राप्त झालें म्हणजे डोळ्यांवर धूर येऊं न देतां फार सावधगिरीनें वागावें. कारण तें दोन प्रहरच्या सांवलीसारखें आहे.

(२४)

सद्वर्तन हीच ह्या जगांत खरी अब्रू, खरी साख,

खरी योग्यता आणि खरें भांडवल होय. तें नाहीं म्हणजे कांहीं नाहीं.

( २५ )

आईबापांची सेवा करण्याची सोन्यासारखी पर्वणी ज्यांस परमेश्वरकृपेनें प्राप्त होते त्यांनीं ती कांहीं केल्या वायां जाऊं देऊं नये.

( २६ )

दुसऱ्यानें दिलेलें दुःख शांतपणानें सोसणें आणि त्यास परत न दुखविणें याच वृत्तीला सहनशीलता म्हणतात.

( २७ )

आपण केलेला उपकार दुसऱ्यांनीं जाणला नाहीं ह्मणून त्याबद्दल विषाद वाटून घेऊन आपल्या आंगची सदयता सोडणें हें खऱ्या सज्जनांचें ब्रीद नव्हे.

( २८ )

संसारांत मनुष्यामागें ज्या अनेक उपाधि लागलेल्या आहेत त्यांत कुटुंबकलह ही एक मोठी जबरदस्त उपाधि होय. तिची व्यापकता मोठ्या राजवाड्यापासून तों एखाद्या भिकार झोंपडीपर्यंत बहुधा सर्वत्र सारखी आढळते.

( २९ )

विपत्काल आला ह्मणजे मनुष्यानें धैर्य न सोडतां फार विचारानें व मनोनिग्रहानें वर्तन करावें यांतच त्याला खरें सुख लाभतें.

( ३० )

सर्वांवर प्रीति करावी; विश्वास मात्र थोड्यांवर ठेवावा आणि वाईट असें कोणाचेंच करूं नये.

( ३१ )

कालाचा कांहीं नियम नाहीं. विपरीत काल वाईटांस येतो, तसा चांगल्यांसही येतो. पण त्यांत चमत्कार असा आहे कीं, जरी विपरीत काल आला आणि मनाला असत्कर्म वाटतें तें करावें लागलें तरी थोर पुरुष सरलता आणि सत्य यांस धरून राहतात.

( ३२ )

सद्गुणापासून मोठमोठे लाभ होतात. जर जगांत मोठेपणा व सुजनपणा मिळवावयाचा असेल तर सद्गुणी मनुष्याचाच कित्ता वळविणें अत्यंत जरूर आहे. तोच सुख प्राप्तीचा खरा मार्ग आहे.

( ३३ )

जग हें एक अफाट रंणांगण आहे. त्यावर संसाराची एक लहानशी चकमक आहे. त्यांमध्यें प्रत्येक स्त्रीपुरुषानें मोठ्या शौर्यानें लढून विजयी व्हावें यांतच त्यांचे जन्माचें खरें सार्थक आहे.

( ३४ )

सोप्या गोष्टी करण्यामध्यें मोठीशी किंमत नाहीं; पण कठिण ज्या आहेत त्याच करण्यामध्यें मनुष्यास एक प्रकारचें श्रेष्ठ धारिष्ट लागतें.

( ३५ )

जगांत आजवर जे थोर महात्मे होऊन गेले त्यांचीं चरित्रें सतत अवलोकन करावींत. कारण त्या योगें

' त्यांच्या सारखे आपण होऊं ' अशी स्फूर्ति कोणाच्या मनांत कधीं निपजेल याचा मुळींच नियम नाहीं.

( ३६ )

सत्य आणि प्रिय भाषण करावें; पण सत्य देखील अप्रिय वाटेल अशा रीतीनें बोलूं नये. व प्रिय पण असत्य असें भाषण कधींच करूं नये.

( ३७ )

ज्याला संसार यशस्वी करून घेण्याची इच्छा आहे त्यानें प्रथम आपली आशा मर्यादित ठेवावी. जें काय प्राप्त झालें आहे त्यापासून जेवढें सुख घेतां येईल तेवढें त्यानें घेण्यास झटावें.

( ३८ )

कुटुंब हें एक चिमुकलें राज्य आहे, त्यांत आई-बापें हीं राज्याधिकारी आहेत, आणि मुलें प्रजा आहेत.

( ३९ )

मनुष्याची पहिली शाळा घर आणि आईबापें हींच त्याचे मूळ शिक्षक.

( ४० )

आपल्या अंतरात्म्यास जें कृत्य करून सुख वाटेल तें कृत्य प्रयत्नानें करावें, व त्याच्या उलट प्रकारचें कृत्य आपल्या हातून होऊं नये अशी खबरदारी घ्यावी.

( ४१ )

आदरबुद्धि ठेविल्यानें श्रेष्ठ जे असतात ते आपल्यावर लोभ ठेवितात; बरोबरीचे असतात ते आपणाशीं अनुकूल होतात; व कनिष्ठांना आपण प्रिय वाटतों.

( ४२ )

या अफाट जीवित्वाच्या प्रवासांत मनुष्याला 'गृह' हें विश्रांतीचें, ज्ञानाचें व शांतिसुखाचें खरें निधान आहे.

( ४३ )

जगांत जे ह्मणून श्रेष्ट पुरुष असतात ते जीं कर्में करितात त्यांचेंच अनुकरण इतर सामान्य जन करितात. ह्मणून थोरांचें वर्तन निष्कलंक असावें.

( ४४ )

कोणाची मर्यादा कशी राखावी, गोड व खरें भाषण कसें करावें, पातिव्रत्याचरण कसें करावें, गृहकृत्यें कशीं करावीं, स्त्रीधर्मानें कसें वागावें, लहान मुलांचें पालनपोषण कसें करावें, काटकसर करून संसारांत मितव्ययी कसें बनावें वगैरे गोष्टींचें ज्ञान हेंच कुलस्त्रियांचें मुख्य शिक्षण होय.

( ४५ )

स्त्री ही पुरुषाला परमेश्वरानें दिलेली एक बहुमोल देणगी होय. तिची उद्योगशिलता हीच त्याची खरी संपत्ति; तिची काटकसर हाच त्याचा खजिना; तिचा उपदेश हेच त्याचे खरे हितचिंतक मित्र; आणि तिचें प्रेमपूर्ण दृष्टीनें पाहणें हेंच त्याच्या चिंतेचें हरण.

( ४६ )

आकाश नक्षत्रांनीं शोभतें, उद्यान कुसुमांनीं शोभतें, व गृह बालकांनीं शोभतें.

( ४७ )

उत्तम गृहिणी ही गृहोद्यानांतील कोमल व सुकुमार लतिका होय. कसलेंही संकटाचें किंवा विपत्तीचें

भयंकर वारें सुटलें, तरी ती आपल्या प्रिय पतिपाद-पालाच गच्च धरून सुखानें कालक्रमणा करिते.

( ४८ )

सच्छील व पवित्र अंतःकरणाचा साधु पुरुष हा मानव कोटींतला मूर्तिमंत ईश्वरी अंश होय.

( ४९ )

सूर्योदय झाल्याबरोबर त्याचे किरण प्रथम उंच पर्वताच्या शिखरावर पडतात, व पुढें हळू हळू त्यांचा प्रवेश दऱ्याखोऱ्यांतून होतो. अशीच गोष्ट श्रेष्ठ व ज्ञानी पुरुषांची आहे. त्यांना ज्ञानप्राप्ति अगोदर होते. व मग तें ज्ञान अज्ञ जनांस समजावून देण्याचें काम ज्ञानी पुरुष आपल्या अमृत वाणीनें व पवित्र कृतीनें करितात.

( ५० )

जो पुरुष आज्ञाधारक पुत्र, उद्योगी पिता, मायाळु पति, प्रेमळ बंधु, साहाय्यकारी मित्र, निरुपद्रवी शेजारी व उदार मनाचा धनी आहे तोच पुरुष या जगांत धन्य होय.

( ५१ )

सुशील, सन्मार्गवर्ती व सद्गुणी स्त्री ज्याला प्राप्त झाली आहे त्याला संसारांत किती जरी क्लेश व श्रम पडले तरी त्याला तो संसार इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें वाटतो.

( ५२ )

मूर्ख ऐश्वर्य प्राप्त होऊन ते सोन्याच्या अंबारींत बसून जरी मिरवले आणि पंडित निर्धन होत्साते अनवाणी पायांनीं जरी चालले तरी जे श्रेष्ठ ते श्रेष्ठच.

( ९३ )

जे स्वभावतःच सज्जन आहेत त्यांचें शील दुष्टांच्या संगतीनें किंवा उपदेशानें कालत्रयींही विघडत नाहीं.

( ९४ )

कांता सदाचारी असल्यास पतीचें मन सदा सुप्रसन्न व प्रफुल्लित राहून महत्कार्य करण्यास त्याला प्रोत्साहन मिळतें.

( ९५ )

द्यूत ह्मणजे जुगार खेळून जे श्रीमंत होण्याची अशा करितात, जे दुसऱ्याची सेवा करून मानाची अपेक्षा करितात आणि जे भिक्षा मागून ऐषआरामांत व चैनींत राहण्याची हौस वाळगतात त्यांच्या सारखे मूढ व हातभागी दुसरे कोणींच नाहींत.

( ९६ )

पुरुष व स्त्री या दोघांचें अनुरूप असें जोडपें होऊन लग्नविधि झाला असतां परस्परांचें प्रेमाकर्षण होऊन संसारचक्र सुरळीत चालतें.

( ९७ )

स्त्री ह्मणजे राष्ट्राचे अलंकार, रयतेची अधिष्ठात्री देवता, पुढील संततीची मार्गोपदेशिका, आपल्या गृहाची शोभा आणि पतीचा केवळ नयनोत्सवच होय.

( ९८ )

पति सद्गुणी असला तर स्त्रीचें चित्त सदैव संतुष्ट राहून भावी संततीस सदाचाराचें व नीतीचें शुद्ध वळण लागतें.

( ५९ )

स्त्रियांस; पतिसेवेव्यतिरिक्त अन्य धर्मच नाहीं. सर्व विहित कृत्यें पतिसेवेंतच असल्यामुळें तीच त्यांनीं यावज्जीव करणें हें त्यांचें पवित्र कर्तव्य होय.

( ६० )

विवाहपद्धतीची स्पृहणीय अवस्था ह्मटली ह्मणजे नवरावायकोचें परस्पर चांगलें प्रेम; तिची सर्वोत्कृष्ट स्थिति ह्मटली ह्मणजे दृढानुबंधन; आणि तिचें मनोहर स्वरूप ह्मटलें ह्मणजे कुटुंबवात्सल्य.

( ६१ )

नवरावायकोचा परस्पर अगदीं निकट संबंध असल्या कारणानें स्त्री ही बहुतकरून आपल्या पतिचेच गुण घेऊन उठते. आणि ह्मणूनच पतीचें आचरण ज्या मानानें शुद्ध असेल त्या मानानें स्त्रीचें आचरण पवित्र असतें.

( ६२ )

या सृष्टींत अनेक चमत्कार आहेत; पण मनुष्य प्राणी हा या सृष्टींतला अत्यंत महत्वाचा व उत्कृष्ट असा चमत्कार होय.

( ६३ )

जे जातीचेच स्वच्छ व दोषरहित असतात त्यांस दुसऱ्यांनीं दोष दिला असतां तो त्यांना मुळींच सहन होत नाहीं.

( ६४ )

सदय, परोपकारी, व सन्मार्गानें वर्तन करणाऱ्या

पुरुषाच्या घरीं जर लक्ष्मीनें वास केला नाहीं तर ती बिचारी आपण होऊन फसली असें ह्मटलें पाहिजे.

( ६५ )

मानवी उन्नतीला मुख्यत्वेंकरून स्त्रीच कारण आहे.

( ६६ )

ज्यांच्या मानसिक व नैतिक शक्तींच्या बलावर व्यक्तिसमुदायाच्या नीच मनोवृत्तीस आळा बसतो ते उच्च मनोवृत्तीचे थोर पुरुष होत. लोकनायकत्वाची पात्रता अशांच्याच आंगीं असते.

( ६७ )

परहितबुद्धि अंतःकरणांत उत्पन्न होणें हें एक मनुष्याच्या उच्च मनोवृति जागृत झाल्याचें लक्षण आहे.

( ६८ )

पुरुषांची स्त्रियांविषयीं मुख्य इतिकर्तव्यता ह्मटली ह्मणजे स्त्रीसंगोपन व स्त्रियांची इतिकर्तव्यता ह्मटली ह्मणजे पतिसेवा व पुत्रकल्याण होय.

( ६९ )

केवळ स्वदेशकल्याणाच्या पवित्र हेतूनें प्रेरित होऊन जे स्वदेशाची निष्काम व निस्सीम सेवा करितात तेच कायमचे किर्तिमंदिरांत विराजमान होतात. आपली स्वतःची प्रतिष्ठा वाढावी या स्वार्थपर बुद्धीनें जे पुढें येतात ते शेवटीं पराकाष्ठेचे लोकनिंदेस पात्र होतात.

( ७० )

आपल्या स्वतःचें व अंशतः आपल्याशीं अगदीं निकट संबंधानें बद्ध झालेल्या कांहीं नियमित व्यक्तींचें सुख साध्य झालें ह्मणजे आपल्या आयुष्यांतील मुख्य

कर्तव्य संपादिलें गेलें अशी ज्यांची समजूत झालेली असते ते क्षुद्र व संकुचित दृष्टीचे लोक होत.

( ७१ )

मर्यादा ही प्रत्येक गोष्टीला आहेच. सज्जन जरी मर्यादेनें नियमित झालेले असेल तरी त्यांचा जर अतीच उपमर्द झाला तर त्यांस तो कसा सहन होणार?

( ७२ )

चंद्र, सूर्य इत्यादिकांच्या अनियंत्रित व्यापारापासून मनुष्यानें पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. घोर व भयंकर अशा संसाराटवींतून मनुष्य आपला मार्ग क्रमीत असतां जर दुर्दैवाची काळीकुट्ट रात्र पडली तर त्यानें दुर्दैवाला हार जाऊन आपल्या जीवित्वाला धिःकारूं नये. कारण कांहीं वेळानें रात्रीचा अंधार नाहींसा होऊन पूर्ववत् प्राच्य दिशा प्रफुल्लित होणार हें त्यानें पक्कें लक्ष्यांत ठेवावें.

( ७३ )

मनुष्यमात्राला या जगांत जसे सुखाचे व आनंदाचे प्रसंग येतात तसे त्याला दुःखाचे व संकटाचेही प्रसंग येतात. पण संकटापासून मनुष्याच्या आंगीं सहिष्णुता येते. सहिष्णुतेपासून अनुभव व शिक्षण हीं प्राप्त होतात.

( ७४ )

कुटुंबांतील सर्व माणसांपेक्षां ' आई ' हें एक अत्यंत वजनदार माणूस आहे. तिच्या उदाहरणाचा जोर सर्वांपेक्षां अधिक असतो. व तिच्याच हातांत

पुढील पिढी उत्तम प्रकारची तयार करण्याचें कठिण पण मोठ्या महत्त्वाचें काम असतें.

( ७५ )

सज्जन जे आहेत ते अप्रिय व कटु भाषण ऐकून-ही नेहमीं गोडच बोलत असतात.

( ७६ )

आपणापेक्षां जे ज्ञानानें, धनानें व वयानें थोर असतील त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें मान देऊन त्यांचा नम्रतापूर्वक मोठा आदरसत्कार करणें यांतच खरा लौकिक आहे.

( ७७ )

जे खरे सभ्य, सुशील व सुशिक्षित लोक आहेत तें भाषण करिते वेळेस बीभत्स व ग्राम्य शब्दांचा कधींच उपयोग करीत नाहींत.

( ७८ )

सहनशीलता हा गुण अवश्य संग्रहीं ठेवण्यासारखा आहे. कारण दुसऱ्यानें आपले दोष व चुका दाखविल्या असतां जो त्याच्या विषयीं मनांत कांहीं न आणितां निमूटपणें सहन करितो त्याची सुधारणा लवकर होते.

( ७९ )

परमेश्वराच्या मनांत कोणतीही गोष्ट कर्तव्य असली ह्मणजे तेथें दुसऱ्याच्या सहाय्याची मुळींच अपेक्षा नसते.

( ८० )

आधीं मनुष्याचें मनच फार वाईट आहे. त्यालाच प्रथम सुसंस्कृत करण्याचा मनुष्यानें प्रयत्न करावा.

कारण पापाचरण प्रथम मनानेंच अनेकवार घडतें आणि नंतर तें हातानें घडतें असा नियम आहे.

( ८१ )

बालकांचे बोबडे व मधुर बोल ऐकून हृदयामध्यें आनंदाचें भरतें कसें येतें याची कल्पना मुलांवर प्रेम करणाऱ्या आईबापांशिवाय इतरांस मुळींच यावयाची नाहीं.

( ८२ )

लग्न झालें ह्मणजे पुरुषाच्या काय किंवा स्त्रीच्या काय आयुष्याला एक प्रकारचें नवीन वळण लागतें. विवाहानें मनुष्याच्या मनांत एक प्रकारचा आशांकुर उत्पन्न होतो. व त्या योगें उभयतां स्त्रिपुरुषांचें आयुःक्रमण ताज्या दमानें व मोठ्या उमेदीनें संसार करण्यांत जाऊं लागतें.

( ८३ )

विवाह हें एक प्रकारचें बंधन तर खरेंच. पण त्यांत [illegible]ल्या कारणानें तें स्त्रीपुरुषाला परम सुखाचें वाटतें. विवाहानें ईश्वराच्या भक्तीस योग्य अशी पवित्रता आंगीं येते.

( ८४ )

प्रत्येक बाबदींत मनुष्यानें आपल्या बुद्धीप्रमाणें जास्त फायदा कशांत आहे इकडे दृष्टि देऊन वागण्यापेक्षां जास्त योग्य व रास्त कोणतें आहे इकडे नजर देऊन वागणें थोरपणाचें आहे.

( ८५ )

या जगांत सुष्टांपेक्षां दुष्टच फार आहेत व त्यांचे

जीवित दवडण्याचे मार्गही दुष्टपणाचेच असतात. त्यांना दुसऱ्याचें नुकसान केल्याशिवाय चैनच पडत नाहीं. कारण दुष्टपणा हें त्यांचें रोजचें खाणें व अपकृति करणें हें त्याचें रोजचें पिणें.

( ८६ )

मित प्रमाणानें स्वतःच्या ज्ञानाविषयीं व सामर्थ्याविषयीं अभिमान असणें कांहीं वावगें नाहीं. कारण स्वतःच्या सामर्थ्याचें ज्ञान व स्वावलंबन हीं एकच होत.

( ८७ )

मोठमोठीं पुस्तकें वाचल्यानें ज्ञानप्राप्ति होत नाहीं. वाचन व निदिध्यास यांच्या योगानें अंतःकरणांत ज्ञानाचा थोडथोडा प्रकाश पडूं लागतो.

( ८८ )

स्वभावांत मार्दव, प्रेमळपणा व कळकळ हीं असावीं. मनुष्याला सहानुभूतिपासून पुष्कळ मदत होते.

( ८९ )

क्षमा हें सत्पुरुषाचें बल आहे.

( ९० )

उपकार सज्जनांवर करावा; दुर्जन व दुष्ट माणसांवर कदापि करूं नये.

( ९१ )

उत्कर्षाचा मूळ पाया धर्म व धर्माचा मूळ पाया श्रद्धा.

( ९२ )

मनुष्यानें सतत आत्मपरीक्षण करावें. कारण आत्मोन्नतीची खरी गुरुकिल्ली त्यांतच आहे.

(९३)

गरिबांस पैशाची मदत करणें हा एक परोपकाराचा मार्ग तर खराच; पण त्याला त्याचें स्वतःचें ओझें उचलितां येईल अशा प्रकारची उमेद त्याच्या अंगीं उत्पन्न करणें हा परोपकाराच्या मार्गांपैकीं एक अति उत्कृष्ट मार्ग होय.

(९४)

ज्या प्रमाणें चतुर व हुषार दर्यावर्दी दर्या तुफान झाला असतांहि आपली नौका धीर धरून आटोपून धरितो व पैल तीरास नेऊन पोंचवितो त्याप्रमाणें प्रत्येक मनुष्यानें आपली प्रपंचनौका संकटांचें केवढेंही भयंकर वादळ झालें तरी हातची न सोडितां ती मोठ्या धैर्यानें व चातुर्यानें पैल तीरास नेणें यांतच त्याचा खरा पुरुषार्थ आहे.

(९५)

मनुष्यास स्वतःच्या दोषावांचून प्राप्त झालेली विपत्ति जर त्यानें धैर्यानें सहन केली, तर यांतच त्याचा खरा थोरपणा आहे व त्या त्याच्या सहिष्णुतेबद्दल परमेश्वर त्याच्यावर सदोदित संतुष्ट असतो.

(९६)

मनुष्यानें आपल्या चालत्या काळांत होईल तेवढा परकार्यार्थ आपल्या तनमनधनाचा उपयोग करावा. कारण श्रीमंतींत जगण्याचें खरें सार्थक त्यांतच आहे.

(९७)

लक्ष्मी आपल्या जवळ सदैव रहावी व ती आपणांस व आपल्या मुलाबाळांस निरंतर सुख देणारी व्हावी

असें ज्यांस वाटत असेल त्यांनीं सन्मार्गानें पैसा मिळ-विण्याविषयीं शिकलें पाहिजे. अन्यायानें व अनीतीनें मिळविलेलें धन परिणामीं दुःखास कारण होतें.

( ९८ )

विख्यात पुरुषांच्या पुण्यमयी मूर्ति व त्यांच्या पवित्र कृति रात्रंदिवस डोळ्यांपुढें आल्यानें मनाचा मलिनपणा नष्ट होतो व आत्मोन्नतीचा मार्ग दिसूं लागतो.

( ९९ )

जे खरे सज्जन आहेत त्यांची कोणी स्तुति किंवा निंदा केली तरी त्यांच्या मूळच्या स्वभावांत अणुमात्र देखील फरक होत नाहीं.

( १०० )

मनुष्य निरुद्योगी आणि आळशी असला ह्मणजे त्याच्या अंगांत दुर्गुण हालोहाल शिरतात; आणि ते त्याच्या नाशास कारण होतात. तो उद्योग करीत राहिला ह्मणजे सत्सहवासानें त्याला चांगले गुण लागून त्याचें कल्याण होतें.

( १०१ )

खरेपणानें वागणाऱ्या पुण्यवान् पुरुषाला संपत्ति आपोआप प्राप्त होते. पण खोटेपणानें वागणाऱ्या अधमाच्या हातांत असलेली संपत्ति पार नाहींशी होते.

( १०२ )

धर्म, नीति आणि उदात्त विचार यांचें ज्या लोकसमाजांत भरपूर सिंचन होतें तो समाज हालोहाल उदयाचलीं येतो.

( १०३ )

ज्याला स्वतःच्या घरांत नीट व्यवस्था करितां येत नाहीं, त्याला गांवची व्यवस्था लावितां यावी कशी ? आणि गांवची व्यवस्था ज्याला साधत नाहीं, त्यानें देशाच्या कारभाराची हांव कशाला धरावी ?

( १०४ )

समजलेलें समजावण्याचा व न समजलेलें समजावून घेण्याचा क्रम जर प्रत्येक मनुष्यानें स्वीकारला तर समाजकार्य होऊन राष्ट्रसुधारणेलाही पुष्कळ मदत होते.

( १०५ )

समाजोन्नतीच्या खऱ्या अभिवृद्धीचा पाया ज्या साहित्यानें बळकट होतो तें साहित्य हें कीं घरामध्यें आचारविचारांची शुद्धता असणें, लोकांची श्रद्धा धर्म नीतीवर पुष्कळ असणें, लोकांच्या सर्व व्यवहारांत प्रामाणिकपणा असणें, सार्वजनिक हित साधण्याविषयींची प्रवृत्ति असणें आणि लोकांच्या संवयी अगदीं साध्या व निर्मळ असणें.

( १०६ )

राजा व प्रजा हीं दोन राष्ट्ररूप रथाचीं चाकें आहेत. तीं दोन्हीं सारख्या वेगानें व एकाच दिशेनें चालल्यावांचून राष्ट्राची खरी प्रगति होत नाहीं.

( १०७ )

संसार हें एक नाटक आहे. मनुष्यें त्यांतील नट आहेत. आणि राजा, प्रजा, श्रीमंत व गरीब या त्यांतील निरनिराळ्या भूमिका आहेत.

( १०८ )

या जगांत सद्गुण हेंच खरें स्वार्थसाधन आहे. व अनीति हाच खरा स्वार्थनाश आहे.

( १०९ )

कर्तव्य करावें एवढाच मनुष्याचा अधिकार आहे. त्या कर्तव्याच्या फलविषयीं त्यानें आसक्ति ठेवूं नये व कर्म करण्यास कधीं चुकूं नये.

( ११० )

सदाचारानें मनुष्यास आयुष्य, संतति, धन हीं प्राप्त होतात; व अशुभ गोष्टींचा नाश होतो.

( १११ )

ज्ञानापेक्षां सदाचरणाची योग्यता अधिक आहे.

( ११२ )

पुत्राचें लक्षणच असें आहे कीं, वडिलांचें जें कर्म असेल तें भरून काढून जो त्याचें संरक्षण करितो तोच खरा पुत्र होय.

( ११३ )

पुत्र हा आपल्या पित्याचा या लोकींचा प्रतिनिधी होय. तो पुण्यकर्मासाठीं या कर्मभूमींत पुत्ररूपानें राहतो.

( ११४ )

स्त्री आणि श्री यांमध्यें फरक नसून जे पुरुष आपल्या गृहिणीला लक्ष्मीप्रमाणें मान देतात तेच या संसारांत भाग्यानें व सुखानें नांदतात.

( ११५ )

प्रजा, चरित्र, कुल, कीर्ति आणि धर्म या सर्वांची

शुद्धि राखण्याकरितां स्त्रियांनीं पातिव्रत्याचरणानेंच राहणें अत्यंत आवश्यक आहे.

( ११६ )

पतिपत्नीचें जोडपें सदां एकचित्त असावें. त्यामध्यें कलह होणें चांगलें नाहीं; कारण त्याच्या योगानें मुलांचें संगोपन व शिक्षण चांगलें होत नाहीं व पुढील संततिही चांगली निपजत नाहीं व शेवटीं कुल वाईट दशेला येऊन पोहोंचतें.

( ११७ )

समाजाला शास्ता व नियंता पाहिजे. तो जर नसेल तर समाजबंधनें दृढ राहणार नाहींत.

( ११८ )

कोणत्याही सद्विद्येचा उपदेश श्रद्धालु व सदाचारी अशा सच्छिष्यास करावा ह्मणजे त्यापासून फल होतें. दुराचारी व नास्तिक अशा शिष्याला केलेल्या उपदेशापासून फल प्राप्त होत नाहीं.

( ११९ )

कोणालाही त्रास किंवा पीडा न देतां मनुष्यानें धर्म आणि अर्थ यांचा संचय करावा.

( १२० )

मनुष्यास जी उत्तम, मध्यम आणि अधम स्थिति प्राप्त होते तीस कारण त्याचें बरें वाईट कर्मच होय.

( १२१ )

देव, ऋषि व पितृऋण अशीं तीन प्रकारचीं ऋणें आहेत. यज्ञानें देवांचें ऋण फिटतें. वेदाध्ययनानें ऋषीं-

चें ऋण फिटतें आणि पुत्रोत्पादनानें मनुष्य पितृऋणांतून मुक्त होतो.

( १२२ )

अनीतीनें व अन्यायानें दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें, परस्त्री उपभोगणें व हिंसा करणें हे शारीरिक दोष होत. कठोर बोलणें, दुसऱ्याची निंदा करणें व असंबद्ध प्रलाप करणें हे वाणीचे दोष होत. आणि दुसऱ्याचें नुकसान करण्याची रात्रंदिवस इच्छा करणें व परक्याचें धन अपहार कसें करावें याविषयीं निरंतर चिंतन करणें हे मानसिक दोष होत.

---

## MISCELLANEOUS.

# [ सर्व साधारण. ]

( १ )

कोणत्याही अंगीकृत कार्यांत यश येण्याचें मुख्य साधन ' निश्चयाचें बळ ' होय. तें बळ असलें ह्मणजे बाकीचें साहित्य आपोआप त्याच्या मागें येतें.

( २ )

मनुष्याची कर्तबगारी त्याच्या स्वतःच्या कामावरून कळत नाहीं. तर लोकांकडून काम करून घेण्यावरून ती कळते.

( ३ )

ज्यांच्या मनांतून उद्योगधंदा करून पैसा संपादन करावयाचा आहे त्यांनीं पाठशाळांत आणि विश्वविद्यालयांत फार दिवस राहूं नये.

( ४ )

संपत्ति मिळविणें हें काम जरा सोपें आहे असें मानिलें तरी तिचा सद्व्यय करणें हें काम फार कठिण आहे..

( ५ )

अज्ञानी राहणें हें जर शहाणे होण्याइतकेंच चांगलें असतें तर शहाणे होण्याचा प्रयत्न कधीं कोणीं केला नसता.

( ६ )

आंगीं गुण असणें आणि तो दाखविण्याचा प्रसंग प्राप्त होणें या दोन गोष्टी भाग्योदयास अवश्यक असतात.

(७)

वाङ्मयापेक्षां शास्त्रीय विषयाकडे विशेष लक्ष पुरविणें चांगलें. मृत राष्ट्राच्या मृत भाषांचा अभ्यास करण्यांत वेळ घालविणें चांगलें नाहीं.

(८)

ग्रंथसंग्रहालयें हीं मूर्तिमंत ज्ञानसत्रें होत. त्यांची किंमत अन्नसत्रापेक्षां अधिक आहे. कारण अन्नसत्रांनीं देह पोसला जातो. पण ज्ञानसत्रांनींअर्थात् ग्रंथसंग्रहालयांनीं ( लायब्ऱ्यांनीं ) आत्म्याचें पोषण होतें.

(९)

काम मग तें किती जरी कठिण असलें तरी तें जर बेतानें केलें तर सुखास कारण होतें.

(१०)

विद्वान् लोक श्रीमंत मनुष्याच्या आश्रयाची फार इच्छा करितात; पण बहुतेक संपत्तीमान् लोक विद्वान् लोकांच्या सहवासाची मुळींच अपेक्षा करीत नाहींत. याचें कारण हें कीं, विद्वानांस संपत्तीची किंमत कळते आणि संपत्तिमान् लोकांस विद्येची किंमत कळत नाहीं.

(११)

साहचर्यानें मनोभावना प्रगट होतात. यासाठीं नेहमीं सत्समागमांत आयुष्य घालवें. कारण सद्गुणानें सद्गुण वाढतात व दुर्गुणानें दुर्गुण वाढतात.

(१२)

मनुष्याच्या भाग्याचा उदय हा कमलाच्या विका-

साप्रमाणें आहे. ह्मणजे कमल विकास होण्यास जशी सूर्योदयाची आवश्यकता लागते तशी मनुष्याच्या भाग्योदयाला विशेष परिस्थितीची अत्यंत जरूर आहे.

( १३ )

सदां सर्वकाल उद्योग किंवा श्रम करणाऱ्या मनुष्याची निद्रा ही त्याच्या सहचारिणीप्रमाणें नेहमीं त्याच्या जवळ असते.

( १४ )

श्रम हें कार्यसिद्धीचें मोल आहे आणि कष्ठ हें थोरपणाचें मोल आहे.

( १५ )

प्रत्येक व्यक्तीनें आपलें शील उत्तम बनविण्याविषयीं फार खबरदारी घ्यावी. कारण त्याचा परिणाम समाजावर व राष्ट्रावर होतो.

( १६ )

ग्रंथपरीक्षण असें करावें कीं, ग्रंथांतील चांगल्या अस्पही गुणांबद्दल ग्रंथकारास उत्तेजन व प्रोत्साहन द्यावें. त्यांतील दोष दाखविणें झाल्यास ते अशा रीतीनें दाखविले जावे कीं, त्याबद्दल त्यास वाईट न वाटतां दोष दाखविणाऱ्याविषयीं त्याच्या मनांत पूज्यबुद्धि रहावी.

( १७ )

कार्यांत सिद्धि प्राप्त होण्यास आपल्या सामर्थ्याचें अनुमान बरोबर केलें पाहिजे. तें अनुमान कमी झालें तर सहज प्राप्त होण्यासारखे लाभ हातचे जातात.

( १८ )

पैसा सांचवून ठेवून त्याचा उपयोग आपल्या प-

श्चात् दुसऱ्यांनीं करावा अशी इच्छा करीत राहण्यापेक्षां तो ज्याचा त्यानें आपल्या हातानें नीतीच्या द्वारें नीट खर्च करणें यांतच खरें शहाणपण आहे.

( १९ )

शाळेंतील शिक्षण हें विद्यार्थ्यांच्या आंगीं असलेल्या नैसर्गिक ज्ञानशक्तीचा विकास करण्यास व त्यांस एक प्रकारची उत्तम शिस्त लावण्यास पूर्ण समर्थ असतें.

( २० )

प्रकाश पडला आहे तोंपर्यंत मार्ग नीट पाहून प्रवाशानें प्रवास उरकून घ्यावा. अंधार पडल्यावर मग जागचे जागीं चांचपडत पडावें लागेल.

( २१ )

कर्तव्य लहान असो वा मोठें असो तें करण्याची संधि असते, ती साधली पाहिजे. ती एकदां हातची गेली ह्मणजे कांहीं केल्यानें पुन्हां ती आणितां येत नाहीं.

( २२ )

आपल्या आंगीं असलेल्या विशिष्ट कर्तृत्वशक्तीचा उपयोग करण्यास आपणांस संधी मिळेपर्यंत सुज्ञ माणूस आपल्या जिवाची धडपड न करितां स्वस्थ बसून असतो. पण तोच त्याला अवसर सांपडतांच आपल्या बरोबर तो दुसऱ्याचींही प्रगति करून सोडितो.

( २३ )

वृद्धापकाळचें उत्तम विश्रांतिस्थान ह्मटलें ह्मणजे ज्ञान होय. तें तरुणपणीं संपादन केलें असतां ह्मातारपण सुखानें जातें.

( २४ )

उत्तम प्रकारचें शिक्षण संपादन केल्यानंतर पुढें एखादा पोटाचा धंदा पतकरून मजेमध्यें आपलें स्वतः-चें आयुष्य घालविणें हा शिक्षण संपादनाच्या मार्गां-पैकीं एक गौण मार्ग होय.

( २५ )

लहानाचें मोठें होणें हें नुसतें कालगतीवर अवलंबून असतें. त्यास शहाणपणा लागत नाहीं.

( २६ )

विद्यार्जनाचा काल हा अति पवित्र आहे. त्या का-लांत विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत ज्या ज्या ह्मणून प्रे-रणा उत्पन्न होतात, त्याप्रमाणें एकनिष्ठतेनें व्यवहारांत कृति करण्याचा जर त्यांनीं आपल्या मनाचा दृढ संक-ल्प केला तर समाजाच्या व देशाच्या सुधारणेस त्यां-च्या कडून बरीच मोठी मदत होईल.

( २७ )

गणित शास्त्र हें सर्वव्यापी शास्त्र असून तें ज्यो-तिषशास्त्राचें मूर्तिमंत जीवन आहे.

( २८ )

संभाषणांत इतरांवर छाप ठेवण्याची हांव धरूं नये; भाषणांत तसें तत्त्व असलें ह्मणजे ती आपोआपच पडते.

( २९ )

तरवारीची जखम लौकर बरी होते; पण शब्दाची जखव बरी होत नाहीं.

( ३० )

ज्ञान संपादन हें इच्छा असली ह्मणजे प्रौढ वयांत देखील होतें.

( ३१ )

जस जशी सुधारणा वाढत चालली आहे तसतसा माणसांचा द्रव्य लोभ अधिकाधिक वाढत चालला आहे हें एक मोठें अरिष्ट होय.

( ३२ )

भोगील त्याची संपत्ति व जो नुसती राखील तो तिच्यावरचा पहारेकरी.

( ३३ )

सावकार जगांतून नाहींसा व्हावा आणि आपल्या मागचा कर्जाचा तगादा चुकावा अशी इच्छा करणारीं कुळें चांडाळ होत नव्हे पशू होत.

( ३४ )

बाल्यावस्थेंत मनुष्य जीं काय कर्में करितो त्यापेक्षां त्यानें आपल्या कर्तबगारीच्या दिवसांत अर्थात् तारुण्यांत अधिक चांगलीं कर्में करण्याविषयीं दक्षता ठेवणें हें त्याचें कर्तव्यच होय.

( ३५ )

समता व स्वतंत्रता यांच्या शिवाय बंधुत्वाची कल्पना व्यर्थ आहे.

( ३६ )

काल हा आशेचा पाळणा आहे व महत्वाकांक्षेची समाध आहे.

( ३७ )

जगांत खरा कल्याणेच्छु माणूस तो कीं, जो नेहमीं दुसऱ्यास त्याच्या चुका व त्याचे दोष मोठ्या ममतेनें दाखवून मनापासून त्यानें सुधरावें अशी कळकळ बाळगितो.

( ३८ )

दार लावून संकट टळत नाहीं; तें दारांतून नाहीं, तर खिडकींतून येईल.

( ३९ )

केवळ धनाचा संग्रह करण्याकरितां आपण स्वतः विपत्ति भोगणें किंवा आपल्या परिवारास विपत्तींत रहावयास लावणें हें शुद्ध मूर्खपण होय.

( ४० )

पुष्कळ लोक द्रव्याची फुकट स्तुति करितात. द्रव्यांत सगळें सुख आहे ह्मणतात. तर मग ज्यांचीं भांडारें संपत्तीनें भरलीं आहेत असे भूपति कां शोक करितात ?

( ४१ )

ज्ञानाच्या योगानें मनुष्याच्या आंगांत एक प्रकारचें स्वतंत्रपण बाणत असतें.

( ४२ )

मनुष्यानें आपलें मन सदां थोर व उदार ठेवावें ह्मणजे तो सर्वांचा आवडता होतो.

( ४३ )

भूक, थंडी, फाटकीं वस्त्रें पांघरणें, अतिशयित कष्ट, तिरस्कार, संशय, विनाकारण अप्रतिष्ठा या गोष्टी दुः-

सह तर खऱ्याच; पण ऋण हें त्या सर्वांपेक्षांही पराकाष्ठेचें दुःसह आहे. कारण ऋण ही शुद्ध गुलामगिरी आहे.

( ४४ )

सच्चरित्रें वांचून मनास आल्हाद होतो; मोठें कौतुक वाटतें आणि तसें वागण्याविषयीं स्फूर्ति होते. अशीं चरित्रें हीं नीतिदेवतेचीं रमणीय विहारस्थलें होत.

( ४५ )

बालवयांत केलेल्या चुका जर तरुणपणांत व तरुणपणीं केलेल्या चुका जर ज्ञातारपणांत मनुष्यानें त्या न सुधारतां तशाच आपल्या बरोबर ओढीत नेल्या तर त्याच्यासारखा मूर्ख दुसरा कोणीच नाहीं.

( ४६ )

कोंडलेल्या नासक्या पाण्यांत जसे किडे आपोआप पडतात तसे रिकाम्या मनांत कुविचार हे आपोआप उद्भवतात.

( ४७ )

उद्योग, प्रेम आणि आशा यांतच काय तें सगळ्या जन्माचें सुख आहे.

( ४८ )

कला या जशा अचेतन पदार्थांस आहेत तसाच ग्रंथसंग्रह हा विचारास आहे.

( ४९ )

न्याय होऊन त्यांत शेवटीं पराभव झालेला पुरवला; पण अन्यायानें झालेला जय कुचकामाचा होय.

( ५० )

गुरुभक्ति हें सच्छिष्याचें मुख्य लक्षण होय.

( ५१ )

प्रत्येकाच्या स्वभावांत कांहीं ना कांहीं तरी गोम असतेच; पण ती ज्याच्या त्याच्या जवळ असलेली फार चांगली. तिच्यापासून दुसऱ्यास उपसर्ग किंवा त्रास झाल्यास ती घालवून टाकण्याविषयीं प्रयत्न करणें हें शहाणपणाचें काम आहे.

( ५२ )

सृष्टिसौंदर्याच्या अवलोकनानें मनाच्या उदात्त व रमणीय वृती उंचबळतात.

( ५३ )

कविता ही निखिल मानवजातीच्या विचारप्रगतीला, सुधारणेला व मानसिक विकासाला मदत करणारी एक सात्विक शक्ति होय.

( ५४ )

इतिहास न जाणतां राहणें हें बालपण होय. इतिहासाच्या अभ्यासानें मनुष्य शहाणा होतो.

( ५५ )

कोट्यावधि लोकांचें कल्याण करण्याचें सूत्र हातीं येणें,—आणि तें तरुणपणीं हातीं येणें—हें खरोखर परमेश्वराच्या अगाध कृपेचें फल होय. आणि तसें सूत्र हातीं आल्यावर त्या महायोग्यतेस शोभण्यासारखें वागणें हें उन्नत अंतःकरणाचें लक्षण होय.

( ५६ )

दरिद्री मनुष्याचा मुख्य अलंकार गंभीरपणा आणि कुरूप मनुष्याचा अलंकार सुशिलत्व होय.

( ९७ )

मनुष्यानें यावज्जीव आपला अभ्युदय करण्याची खटपट करावी. व तो दुर्लभ आहे असें त्यानें कधीं स्वप्नांत सुद्धां आणूं नये. व तो आजपर्यंत झाला नाही ह्मणून निराश व नाउमेद होऊं नये.

( ९८ )

ज्याप्रमाणें झोंप संपली ह्मणजे मनुष्य तींतून आपोआप जागा होतो त्याप्रमाणें दुर्दैवाचा काळ संपला ह्मणजे भाग्याचा उदय हा आपोआप होतोच.

( ९९ )

भाषा ह्मणजे एकमेकांस एकमेकांचे विचार व्यक्त करण्याचें एक साधन होय. भाषेच्या योगें विचार विनिमय व परस्पर दळणवळण हीं उत्तम प्रकारें चालवितां येतात.

( ६० )

जो गुणज्ञ असतो त्यास गुणी जनाच्या सहवासापासून आनंद होतो. ज्याला गुणाची किंमत नाहीं त्याला त्याची पर्वाही नसते.

( ६१ )

लोकांत मानमान्यता होण्यास चांगलें वस्त्र हें एक मुख्य कारण आहे. जो वस्त्रकळाहीन आहे त्याला कोणी जवळ बोलावीत नाहीं व कोणी ' या बसा ' हीं ह्मणत नाहीं.

( ६२ )

ज्याच्या आंगांत कृति करून दाखविण्याची धम्मक नाहीं त्याच्यापाशीं केवळ ज्ञानाचें भाण्डार जरी

भरलेलें असलें, तरी त्यापासून कांहीं निष्पन्न हो-णार नाहीं.

( ६३ )

जोंपर्यंत मनुष्य निराशेला वश झालेला नाहीं तों-पर्यंत त्याला अपयश आलें असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं.

( ६४ )

इहलोकची यात्रा सफल होण्यास मनुष्यास प्रथम आरोग्य आवश्यक आहे.

( ६५ )

जगाच्या व्यवहारामध्यें न्याय ही एक फार मोठी शक्ति आहे. ती समर्थांस अत्यंत भूषणावह व गरि-बांस केवळ आईसारखी आहे.

( ६६ )

प्रतिकूल काल ह्मणून जर काहींच नसतें तर थोरां-स आणि पराक्रमी पुरुषांस दुःख कधीं शिवलें देखील नसतें.

( ६७ )

मूर्खाला मान ह्मटला ह्मणजे फक्त त्याच्या स्वतः-च्या घरांत, अधिकाऱ्याला त्याच्या गांवांत, राजाला त्या-च्या देशांत पण विद्वानाची मात्र गोष्ट तशी नाहीं. त्याला तो जिकडे जाईल तिकडे मान मिळतोच मिळतो.

( ६८ )

ज्यांच्या अब्रूस दुसऱ्या कोणांकडूनही जेव्हां आश्र-य मिळेनासा होतो, तेव्हां ते आत्मस्तुतीनें आपण आप ली अब्रू वाढविण्याचा प्रयत्न करूं लागतात.

( ६९ )

विपत्तिग्रस्तास प्रत्यक्ष सहाय्य केल्यानें तर संतोष होतोच होतो; पण त्याची स्थिति पूर्णपणें जाणून घेऊन त्यासंबंधीं कळवळा प्रदर्शित केलेला ऐकूनही त्याला फार समाधान वाटतें.

( ७० )

जो खरा ह्मणून जातिवंत घोडा आहे तो समरांगणावर शेंकडों बाणांचे आघात सहन करितो; पण त्याला चाबकाचा फटकारा बिलकूल सहन होत नाहीं.

( ७१ )

या जगांत सुखानें कालक्रमणा करण्यास जसें सन्मार्गाचें ज्ञान आवश्यक आहे तसें ताप टाळण्यास दुष्टांच्या कृतींचेंहीं ज्ञान असणें जरूर आहे.

( ७२ )

मनुष्य वाईट आहे असें सिद्ध होईपर्यंत तो चांगला आहे असें घेऊन चालणें हा न्यायशास्त्रांतला एक सिद्धांत आहे.

( ७३ )

जे लोक दुसऱ्याच्या अन्यायाची क्षमा करण्यास तयार नाहींत त्यांना त्यांच्या स्वतःच्या अन्यायाबद्दल दुसऱ्याकडून क्षमा होण्याची आशा नको.

( ७४ )

जे खरे तेजस्वी व मानी पुरुष आहेत त्यांस विपत्तीचें कांहीं फारसें वाईट वाटत नाहीं; पण कोणीं त्यांस फट् ह्मटलेलें खपत नाहीं.

( ७५ )

पूर्वीं ज्या जागीं वारांङ्गना नृत्य करीत होत्या आणि मोठ्या राजेरजवाड्यांच्या सभा भरत होत्या त्या ठिकाणीं आतां वाघ, लांडगे हिंडत आहेत आणि घुबडें घूं घूं करीत आहेत. यावरून मनुष्यकृतीच्या अशाश्वतिचा विचार करावा आणि गर्व व मीपणा सोडून सावध व्हावें.

( ७६ )

अंधपणें ज्याच्या त्याच्या तंत्रानें वागूं नये व आपल्याच मतासंबंधानें विनाकारण दुराग्रह धरून बसूं नये.

( ७७ )

वाईट कामांतला दृढनिश्चय त्यास हट्ट ह्मणतात व चांगल्या कामांतला दृढनिश्चय यास प्रतिज्ञा ह्मणतात.

( ७८ )

मनुष्याचें चांगुलपण किंवा वाईटपण हें त्याच्या संवयीवर असतें. ह्मणजे ज्याच्या संवयी चांगल्या तो चांगला, आणि ज्याच्या संवयी वाईट तो वाईट.

( ७९ )

मनुष्याजवळ पुरेसें द्रव्य असलें तर त्यापासून त्यास सौख्य होतें. पण त्यापेक्षां जास्त असलें तर त्याची काळजी वाहण्यांतच तो बेजार होऊन जातो.

( ८० )

अशिक्षित, अडाणी व ग्राम्य लोकांचे आचार विचार व शिष्टसंप्रदाय हे शिक्षणाच्या अभावामुळें ग्राम्यच असतात.

( ८१ )

प्रथमतः इकडच्या तिकडच्या यथेच्छ वायफळ

गप्पा मारून नंतर आपल्या स्वतःच्या कामाची एखाद्या थोर माणसापाशीं हळूच गोष्ट काढणें ही आपमतलबीपणाची मोठी असभ्य पद्धत होय.

( ८२ )

या जगांत सर्व कांहीं ईश्वरी सत्तेनेंच चाललेलें आहे. एखाद्या महासत्ताधीश राजाच्या तटबंदी शहरा भोंवतीं हत्यारबंद शिपायांचा कडेकोट पहारा असला तरी त्या शहरावर जर ईश्वरी कृपा नसेल तर तो पहारा अगदीं व्यर्थ होय.

( ८३ )

त्रस्त झालेल्या मनास उच्च प्रतीचे इतिहास, बोधपर वचनें, सुंदर कल्पनातरंग व मागील मनोहर प्रसंगांचें स्मरण हीं सर्व सुख देणारीं विश्रांतिस्थळेंच होत.

( ८४ )

मालकाची नुसती नजर ही त्याच्या हातापेक्षां अधिक काम करिते. काम कऱ्यांवर नजर न ठेवणें हें पैशाच्या पिशवीचें तोंड मोकळें टाकणें होय.

( ८५ )

कोणत्याही प्रकारचें बंधन झालें तरी तें अनिष्टच होय. सोन्याची बेडी झाली ह्मणून ती दुःख दिल्यावांचून कशी राहणार ?

( ८६ )

श्रीमंती सर्वांच्याच नशिबीं नसते; परंतु प्रियजनांचा सहवास व प्रेम यांच्या योगानें एखादी लहानशी झोंपडी देखील आनंद देणारी व सुखकर वाटते.

( ८७ )

या जगांत शरीरसंपत्ति सारखी दुसरी संपत्ति नाहीं. व हृदयाच्या आनंदासारखें दुसरें सौख्य नाहीं.

( ८८ )

निरीक्षणानेंच मनुष्यांचीं मनें प्रथम विकासित व तयार होतात. बाह्य सृष्टींतील गोष्टींचें, वस्तूंचें व विचारांचें प्रतिबिंब प्रथम मनुष्य निरीक्षणानेंच ग्रहण करूं शकतो.

( ८९ )

प्रत्येकानें होतां होईतों आपलें मनोभाण्डार उत्तम विचारांनीं भरून ठेवावें. तें त्याला त्याच्या संकटकाळीं व विपत्काळीं फार उपयोगीं पडतें.

( ९० )

या जगांत मनुष्यमात्राच्या सुखाच्या आड येणाऱ्या खऱ्या गोष्टी ह्मटल्या ह्मणजे गर्व, लोभ, स्वार्थलंटपणा व महत्वाकांक्षा या होत.

( ९१ )

धन मिळवीत असतां फार कष्ट देतें; विपत्काळीं फार ताप देतें; व उत्कर्षाच्या काळीं मद व मोह निपजवितें तर मग द्रव्य सुखदायक तें कसें ?

( ९२ )

धंद्यांत यश येण्यास मुख्यत्वेंकरून सावधानचित्त असणें जरूर आहे. त्या कामीं बुद्धिमत्तेची फारशी गरज लागत नाहीं.

( ९३ )

ज्या मनुष्याला आपल्या स्वतःचें कल्याण ह्मणजे

काय हें जर कळत नाहीं, तर तो दुसऱ्याचा मित्र झाला असतां त्याचें कल्याण तो काय करणार आहे हें उघडच दिसत आहे.

( ९४ )

जगांत कांहीं लोक असे आहेत कीं, त्यांना मुलांच्या शिक्षणासाठीं खर्च करावासा वाटत नाहीं; पण त्यांना असें समजत नाहीं कीं, अज्ञानापासून होणाऱ्या नुकसानीपुढें शिक्षणाचा खर्च कांहींच नाहीं.

( ९५ )

रात्रीं लवकर निजावें आणि पहाटेस पक्षी उठतात तेव्हां उठावें.

( ९६ )

मनुष्यास खरी सुखोत्पत्ति विश्रांतीपासून होते. विश्रांतीनें शारीरिक व मानसिक व्यापार सुखावह होतात.

( ९७ )

व्यायाम हा मनुष्याच्या आरोग्यतेस अत्यवश्यक असून त्यायोगें तो दीर्घायुषी होतो.

( ९८ )

भोंवतालची हवा शुद्ध व मोकळी असल्यास आरोग्याचें संरक्षण उत्तम प्रकारें होतें.

( ९९ )

मितव्ययाचा अतिरेक झाला ह्मणजे लोभ होतो. व प्रेमाचा अतिरेक झाला ह्मणजे मानसिक दुर्बलता येते.

( १०० )

भाषण सुरस व सयुक्तिक करून श्रोत्यांचें मन आ-

पलेंसें करून घेणें ही एक मोठी अवघड कला आहे. हिलाच वक्तृत्व असें ह्मणतात.

( १०१ )

या जगांत कठिण असें कांहीं नाहीं. कारण कोणत्याही वस्तूचा कठिणपणा क्षणभरच भासतो. कार्य सुरू केलें व एकदां सुरू केलेलें कार्य कांहींही होवो पार पाडल्याखेरीच सोडावयाचें नाहीं असा मनाचा पक्का निश्चय केला ह्मणजे कठिण गोष्टीचा कठिणपणा झरकन् वितळून जातो.

( १०२ )

जीवित सफल करून घेणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. व त्यासाठीं खटपट करणारे लोकही जगांत फार थोडे असतात.

( १०३ )

कोणतीही गोष्ट प्रत्यक्ष पाहिली असतां ती जितकी मनावर ठसते तितकी नुसतें तिचें वर्णन ऐकून अगर वांचून ठसत नाहीं.

( १०४ )

खरी हिंमत ही कीं कोणापाशींही दैन्य न दाखवितां स्वतःचे बाहू झिजवून व निढळाचा घाम काढून पैसा मिळवून प्रपंच चालवावयाचा.

( १०५ )

आपणांस सुख मिळावें असें प्रत्येकाला वाटतें, पण तें कसें मिळवावें हें फार थोडक्यांसच ठाऊक असतें.

( १०६ )

याचना करणें हें श्रम करण्यापेक्षा फार कठिण आहे.

( १०७ )

मनुष्याची जिव्हा वचनें देतांना जेवढी लांब होते तेवढा त्याचा हात त्या वचनांची पूर्तता करिते समयीं आंखडता होतो.

( १०८ )

खरा सात्त्विकपणा तो कीं आपल्या उदरनिर्वाहार्थ कोणतेंही दुराचरण केवढाही दुर्धर प्रसंग आला तरी करावयाचें नाहीं.

( १०९ )

संभाषणानें मनुष्याचें अंतःकरण जागृत होऊन स्फूर्ति पावतें; त्याचा ज्ञानाग्नि चेतविला जातो; व त्यामुळें मनुष्याचें खरें तेज प्रकट होतें. ह्मणून संभाषण हें अवश्यमेव करीत जावें.

( ११० )

झोंप येईनाशी झाली ह्मणजे ती पुन्हां येण्यास खरा उपाय हा आहे कीं, घरांत फार वेळ बसून न राहतां मोकळ्या हवेंत जेवढें हिंडून येववेल तेवढें हिंडून यावें व मन स्वस्थ ठेवावें. ह्मणजे निद्रेचें सौख्य पुन्हां प्राप्त होतें.

( १११ )

जगांतील सर्व नवे शोध मोठमोठ्या मननशील पुरुषांकडूनच लागलेले आहेत.

( ११२ )

या जगांत थोर पुरुषास जर कांहीं शोभा देणारी एखादी वस्तू असेल तर ती दयाशीलत्व ही होय.

( ११३ )

स्वामिभक्ति हा सेवक जनांचा एक बहुमोल अलं-

कार आहे. त्यामुळें कित्येक यःकश्चित् सेवक रंकाचे राव झाले.

( ११४ )

स्त्रियांस सौंदर्य शोभा देतें, व पुरुष गुणामुळें शोभा पावतात. पण सौंदर्य व गुण एकत्र झाले असतां त्याची शोभा फारच अपूर्व दिसते.

( ११५ )

मित आहारानें मन प्रसन्न राहतें व अतिशय खाण्यानें मन उदास होतें.

( ११६ )

श्रवणानें मनावर अधिक उत्तम रितीनें ज्ञान बिंवतें, वक्त्यास शंका विचारून आपलें समाधान करून घेतां येतें; वक्त्याचें ज्ञान व अनुभव आपणास श्रमाशिवाय मिळवितां येतात व जीं जगांत रहस्यें ह्मणून आहेत तीं पूर्णपणें कळून येतात.

( ११७ )

दैववादाचें व अज्ञानाचें साहचर्य आहे. कारण मनुष्याच्या बुद्धिसामर्थ्याची गति कुण्ठित होऊन त्याला एखादी गोष्ट समजेनाशी झाली ह्मणजे मग तो दैवाचें नांव घेऊं लागतो.

( ११८ )

राजवाड्यांत राहून अपमान सहन करण्यापेक्षां एखाद्या भिकार झोंपडींत मानानें राहणें फार चांगलें.

( ११९ )

शरिराचें रक्त जसें जीवन आहे, तद्वतच व्यापार हें देशाचें मुख्य पोषक—साधन आहे.

( १२० )

विचारशील लोकांना प्रपंच हा आनंद पर्यवसायी नाटकाप्रमाणें सुखदायक वाटतो. पण तोच विकारवश व विवेकशून्य लोकांना शोकरस प्रधान नाटकाप्रमाणें दुःखदायक वाटतो.

( १२१ )

सृष्टिकर्त्या परमेश्वरानें या भूगोलांत अनंत प्राणी निर्माण केले आहेत; पण त्या सर्वांत मनुष्य हा श्रेष्ठतम गणला गेला आहे. कारण त्याचे ठिकाणीं मन ह्मणजे विचारशक्ति आहे ह्मणून.

( १२२ )

मनुष्याच्या मिळकतीपेक्षां त्याच्या आंगचे चांगले गुण हीच त्याची खरी संपत्ति समजावी. कारण संपत्ति, अधिकार व मानमरातब या गोष्टीं सर्वांसच साध्य असतात अशांतली गोष्ट मुळींच नाहीं.

( १२३ )

जेवतांना, झोंप घेतांना व व्यायाम करितांना मनुष्यानें आपलें मन निश्चित व सुप्रसन्न ठेवावें. हा एक आयुष्यवर्धनाचा उत्तम उपाय आहे.

( १२४ )

आरोग्य हें नेहमीं चांगल्या संवयीवर अवलंबून असतें. औषधासाठीं पैसा खर्च करण्याचे प्रसंग विचारानें वागलें असतां फारच थोडे येतात.

( १२५ )

गुण, मग तो कोणताही असो. जन्मतःच मनु-

त्याबरोबर आलेला नसतो. तो अभ्यासानें प्राप्त करून घ्यावा लागतो.

( १२६ )

दूरदृष्टीनें भावी स्थितीचा विचार ठेवावा हें चांगलें; पण त्या विचाराच्या पायीं आजच्या स्थितीचा तूर्त होत असलेला लाभ हातचा दवडणें हें कांहीं शहाणपण नव्हे.

( १२७ )

या जगांत विद्याधनासारखें दुसरें श्रेष्ठ धन नाहीं, व विद्यादानासारखें दुसरें पुण्य नाही.

( १२८ )

उधळा मनुष्य आपल्या वारसास नागवितो. आणि कृपण मनुष्य स्वतः आपणासच नागवितो.

( १२९ )

कल्याणाकरितां परवशतेचा जाच सोसणें आवश्यक आहे. पण तीच जर सुरीप्रमाणें तीक्ष्ण होईल व शतगुणित जाच करूं लागेल तर त्यापेक्षां नरकवास बरा हें उघड आहे.

( १३० )

ज्या शिक्षणाच्या योगानें मनुष्याला आपले कुटुंबासंबंधीं, समाजासंबंधीं व देशासंबंधीं कर्तव्य नेकीनें, अकलेनें व उदार बुद्धीनें करितां येईल त्यालाच पूर्ण व उदार शिक्षण ह्मणावें.

( १३१ )

मनुष्याला संपत्कालीं विपुल मित्र मिळतात; पण विपत्काल आला असतां त्यांच्या मित्रत्वाची परीक्षा होते.

( १३२ )

शहाणीं मनुष्यें दुसऱ्याचे दोष पाहतात ते येवढ्याच साठीं कीं त्यांजवरून स्वतः आपले सुधारावेत.

( १३३ )

या जगांत मनुष्यप्राणी हा एक शेतकरी आहे. त्याचें जीवित हें एक शेत आहे. त्याची बरी वाईट लागवड करणें हें बहुतेक त्याच्या हातीं आहे.

( १३४ )

अपकार विसरावा; पण उपकार कधीं विसरूं नये.

( १३५ )

सद्ग्रंथ हे सदां तत्पर असे विन पगारी शिक्षक आहेत. ते कधीं रागावत नाहींत व कधीं शिक्षाही करीत नाहींत. ते मोकळ्या मनानें त्यांना जें काय विचारावें त्याचें उत्तर देऊन मनाचें पूर्ण समाधान करितात.

( १३६ )

ज्यांचें मन विद्येनें सुसंस्कृत झालेलें आहे अशा सुशिक्षित विद्वान् माणसाचा काळ काव्यशास्त्रादिकांच्या वाचनापासून होणाऱ्या आनंदांत जातो. पण मूर्खांचा वेळ व्यसनांत, झोंपेंत व भांडणकज्जा करण्यांत जातो.

( १३७ )

चित्तास भूरळ पाडण्याचें काम वास्तविक पहातां इतिहासाचें आहे; पण तें कादंबऱ्यांनीं बळेंच त्याच्याकडून हिसकावून घेऊन त्यावर आपली सत्ता चालविली आहे.

( १३८ )

कोणत्याही गोष्टीसंबंधानें मनुष्यानें आपल्या मना-

ला एकसारखी हुरहूर किंवा चिंता लावून घेवूं नये. कारण तसें केलें असतां त्या गोष्टीचा प्रतिकार होण्याचें दूर राहून उलटी त्याची कार्यक्षमता कमी होते.

( १३९ )

विद्या ही पाऱ्याप्रमाणें आहे. ती चांगल्या मनुष्या-च्या हातीं असली तर तिच्यापासून लोकांना महत् उ-पयोग होतील; आणि वाइटाच्या हातीं असली तर ती-च लोकांच्या महत् नाशासही कारण होईल.

( १४० )

धारिष्ट हा एक अत्यंत महत्वाचा गुण आहे; येव-ढेंच नव्हे पण तो असल्यावांचून पौरुषाची पूर्णताच होत नाहीं.

( १४१ )

मनुष्यानें आपली चूक कबूल करण्यास बिलकूल लाजूं नये. कारण चूक कबूल करणें ह्मणजे आपण काल होतों त्याहून आज जास्त शहाणे आहों असें पर्यायानें दाखविण्याप्रमाणें होय.

( १४२ )

खऱ्या संकटापेक्षां काल्पनिक संकटाचीच भीति जा-स्त वाटते.

( १४३ )

नामाचा महिमा मोठा अगाध आहे. व्यक्तीच्या कृतीनें नामांत विलक्षण जादू उत्पन्न होते.

( १४४ )

वाचन हें भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही का-ळांचें ज्ञान करून देतें. तें शहाण्या, सन्मार्गवर्ती व

विचारशील अशा थोर पुरुषांचा समागम घडवितें व सर्व देशांत वास केल्याचें श्रेय संपादन करून देतें.

( १४५ )

मनुष्य प्राणी हा जेवढा क्षुद्र आहे तेवढा तो श्रेष्ठही आहे. त्याच्या आंगीं आहे ह्मटलें तर सर्व कांहीं आहे, नाहीं तर कांहीं सुद्धां नाहीं. तो मनांत आणील तर मोठ्या योग्यतेस चढण्यासारखा आहे.

( १४६ )

मनुष्याचें आयुष्य ही एक मोठी संधि आहे. ती जितकी साधवेल तेवढी साधून घेतली पाहिजे. कारण काल पुढें पुढें चालला आहे. तो कांहीं मागें मागें येत नाहीं. शिवाय गेल्या कालावर कोणाचीच सत्ता नाहीं.

( १४७ )

राजपदाच्या सुखापेक्षां पुस्तक वाचनाचें सौख्य शतपट श्रेष्ठ आहे. राजा होऊन पुस्तकहीन अशा राजवाड्यांत राहण्यापेक्षां नानाप्रकारच्या ग्रंथांनीं भरलेल्या एखाद्या झोंपडींत वास करणें फार चांगलें.

( १४८ )

मनुष्य वैभवास चढण्यास तो चांगल्या कुलांतच जन्मास यावा लागतो असें नाहीं. कधीं चांगल्या कुळांत निपजून तो फुकट जातो. आणि कधीं वाईट कुळांत निपजूनही तो मोठ्या योग्यतेस चढतो.

( १४९ )

धनुष्यापासून सुटून गेलेला बाण, तोंडांतून निघून गेलेला मर्मभेदक वाईट शब्द आणि सत्कर्म करण्याची

संधि या तीन वस्तू एकदां हातच्या गेल्या ह्मणजे त्या कांहीं केल्या परत येत नाहींत.

( १५० )

ज्याच्या योगानें योग्यता वाढते, जग सुंदर दिसतें आणि जिवाला सुख होतें तें सगळें उद्योगाचें फळ होय.

( १५१ )

ज्या घरांत निरुद्योगी माणसें असतात त्या घरांत विपत्ति हालोहाल शिरते.

( १५२ )

कोणतेंही कार्य हातीं घेतांना तें सिद्धीस नेण्यासाठीं जे उपाय किंवा मार्ग योजावयाचे ते थोरपणाचे व उदात्त असावेत. तशा उपायांनीं किंवा मार्गांनीं चालतां चालतां वेळेस कांहीं अदृश्य कारणांनीं कार्यांत अपयश आलें किंवा कार्यहानी झाली तर तो कांहीं कोणाचा दोष नव्हे.

( १५३ )

बालपण ही विद्याभ्यासाची संधि आहे; तरुणपण ही उद्योगाची संधि आहे; ऐश्वर्य ही नम्रतेची संधि आहे; आणि विपत्काल ही धैर्याची संधि आहे.

( १५४ )

लोभ्याचें लक्ष धनावर, दुष्टाचें लक्ष परनाशावर, विद्वानाचें लक्ष विद्येवर, आणि भगवद्भक्ताचें लक्ष ईश्वरभक्तीवर असतें.

( १५५ )

गाढव उन्हाळ्यांत मृत्तिका फुंकून त्यांत जें मिळेल तें खाऊन तयार असतो; परंतु पावसाळ्यांत जेव्हां चो-

हींकडे हिरवें चार गवत उगवतें तेव्हां इतकें सर्व मी केव्हां खाईन या काळजीनें तो कृश होतो.

( १५६ )

अनुकूल काल आला असतां मनुष्यानें कधींही उन्मत्त होऊं नये; ह्मणजे प्रतिकूल काल जर कधीं त्यास प्राप्त झाला तर त्याच्या वेदना अर्ध्या अधिक तरी कमी होतात.

( १५७ )

कायदे हीं बंधनें आहेत. तीं कोणीं मुद्दाम करीत नाहींत. तीं नसल्यामुळें अडचणी येतात असें अनुभवास येऊं लागलें ह्मणजे माणसें तीं आपणांवर लादून घेतात.

( १५८ )

राजा असो कीं रंक असो, प्रपंची असो कीं अप्रपंची असो, प्रत्यक्ष सुखापेक्षां अप्रत्यक्ष सुखाच्या आशेवर त्याचें उपजीवन फार होतें.

( १५९ )

कोणत्याही प्रकारें कार्यसिद्धीचा मतलब ध्यानांत ठेवून प्रसंगीं वाटेल तसले क्षुद्र व नीच उपाय हातीं धरणें किंवा त्या मार्गांनीं जाण्यास मनांत शंका न आणणें हाच मोठा दोष; भयंकर पाप तें हेंच आहे.

( १६० )

पुष्कळ गोष्टींची आठवण ठेवण्याची खटपट केल्यानें, शारीरव्यायाम अधिक केल्यानें आणि ज्ञान संपादण्यास फार प्रयत्न केल्यानें स्मरणशक्ति कमी होते.

( १६१ )

स्वतःच्या श्रमानें पोट भरणाऱ्या नांगऱ्याची योग्यता दुसऱ्यावर अवलंबून राहणाऱ्या सरदारापेक्षां अधिक आहे.

( १६२ )

कांहींही होवो पण वाईट मार्ग ह्मणून कधीं आयुष्यांत पतकरावयाचा नाहीं, नेहमीं उन्नत मार्गाचाच अवलंब करावयाचा असें ज्यांचें व्रत तींच माणसें खरीं दानतवान् व शीलवान् होत.

( १६३ )

मनुष्यानें नुसती आपली स्वतःची खासगी संपत्ति व मालमत्ता वाढविणें हा त्याच्या आयुष्याला शोभण्यासारखा हेतु नाहीं. आपल्या देशाच्या नोकरींत त्यानें आपल्या आयुष्याचा थोडा तरी भाग खर्च करणें यांतच तो जन्माला आल्याचें खरें सार्थक आहे.

( १६४ )

कोणतीही गोष्ट चांगली किंवा वाईट बनते, त्यांचें कारण परिस्थिति होय. म्हणून सुज्ञ लोक परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्याप्रमाणें कोणत्याही कृत्यास हात घालीत असतात. आणि याचेंच नांव तारतम्य.

( १६५ )

पुष्कळ संकटें दुरून फार भयंकर दिसतात. पण त्यांचें जवळ जाऊन त्यांस धैर्यानें तोंड दिलें असतां तीं मृगजळाप्रमाणें वितळूं लागतात.

( १६६ )

कोणतेंही कर्तव्य जितकीं त्याला जास्त विघ्नें येतात तितकें तें करणाराची योग्यता जास्त वाढवितें.

( १६७ )

जो खरा शूर पुरुष आहे त्यानें आपल्या आंगच्या पुरुषार्थानें जय संपादन करण्याची इच्छा करावी. दुसऱ्याच्या विश्वासघातकीपणानें जय मिळविण्याचा प्रयत्न कधींही करूं नये.

( १६८ )

दारिद्र्य दाराजवळ येऊन आंत डोकावूं लागलें म्हणजे घरांत असलेलें प्रेम खिडकीवाटे पळून जातें.

( १६९ )

नुसतें पांडित्य केल्यानें जगांत कोणतीही गोष्ट घडून येत नाहीं; तर ती कृतीनें घडून येते.

( १७० )

धनाचा अनावर लोभ धरून प्रपंचांत कंजुषपणानें वागणें अगदीं अयोग्य व अश्लाघ्य आहे. पण स्वावलंबन राहण्यासाठीं हात राखून खर्च करणें शहाणपणाचें आहे.

( १७१ )

जग ही एक मोठी शाळा आहे. अनुभव हा त्या शाळेंतील गुरु आहे. तो सर्व प्रकारचें ज्ञान मनुष्य मात्रास सहज करून देतो.

( १७२ )

ज्याच्या जवळ पैसा नाहीं तो गरीब नव्हे, तर

ज्याला पुष्कळ गोष्टींची मनस्वी हांव असते तो गरीब होय.

( १७३ )

प्रकृति अरोग राहील अशी तजवीज ठेवावी. एवढी तजवीज माणसाला ठेवितां आली ह्मणजे ज्याचा तोच वैद्य होईल.

( १७४ )

व्यसन हा दारिद्र्याला बोलावून आणणारा अगदीं इमानी नोकर होय.

( १७५ )

मनुष्याचें मन चंचल आणि अनावर असें जरी आहे तरी तें अभ्यासानें आवरतां येतें.

( १७६ )

सावकार मागेल तेवढें भारी व्याज कबूल करणारें कूळ शेवटीं मुदलाला दगा देणार असें समजावें.

( १७७ )

ज्याला आपण मनुष्यमात्राचा अभ्युदय किंवा राष्ट्राचा उत्कर्ष ह्मणतों त्याचें मूळ बीज उद्योगांत आहे. कारण उद्योग हा नशिबाचा खरा कारागीर आहे.

( १७८ )

ज्ञानासारखें जें कांहीं दिसतें व ज्याच्या योगानें परीक्षा उतरतात तें शिक्षण नव्हे; तर अंतःकरणांत उपयुक्त ज्ञानाचा संचय होणें, त्याच्या योगानें मनास प्रगल्भता येणें, विचारशक्ति वाढणें व नवी युक्ति सुचण्याचें आंगीं सामर्थ्य येणें हें खरें शिक्षण होय.

( १७९ )

जगांत नेहमीं पैशानेंच कार्य होतें असा कांहीं नियम नाहीं. जवळ फुटकी कवडी नसतांनाहीं कांहीं लोक सर्व जगाला प्रिय झालेले आहेत.

( १८० )

स्वातंत्र्यप्रिय जनांस परवशतेची शिक्षा, प्रणयी जनांस वियोगाची शिक्षा व योगी जनांस प्रेमपाशाची शिक्षा. या शिक्षा जगांत फारच कठीण आहेत, व त्या कोणाच्या कधीं वाट्यांस येऊं नयेत हेंच चांगलें.

( १८१ )

पदार्थांची रुचिं ही त्यांतील मालमसाल्यावर सर्वथा अवलंबून नसून शरीराच्या आरोग्यावर अवलंबून असते. पचनशक्ति जर नीट नसेल तर पंचपक्वान्नें सुद्धां बेचव लागतात.

( १८२ )

संपत्तीच्या योगानें जर आयुष्याचा सदुपयोग झाला तर त्या संपत्तीचा खरा उपयोग. नाहीं तर संपत्तीनें जर चिंतेच्या, दुःखाच्या व व्यसनाच्या पाशांनीं बद्ध करून टाकिलें, तर त्या संपत्तीला घेऊन काय करावयाचें आहे ?

( १८३ )

याचकांस मर्मभेदक वाईट शब्दांनीं ताडन करून त्यांची याचना तृप्त करण्यापेक्षां त्यांस मृदु शब्दांनीं स्पष्ट नाहीं म्हटलेलें फार चांगलें.

( १८४ )

दारिद्र्य हा जगामध्यें मोठा जबरदस्त कस होय. मनुष्याच्या सच्छीलपणाची, दानतीची व कुलीनपणाची खरी परीक्षा एका दारिद्र्य स्थितींतच करितां येते.

( १८५ )

जीं पुस्तकें मनाची उदासिनता घालवून सर्व संकटांचा व दुःखांचा परिहार करितात व जीं निरंहकाराच्या उच्च प्रदेशांत नेऊन सोडितात तींच पुस्तकें सर्वांत श्रेष्ठ होत.

( १८६ )

पैशाचा जर शहाणपणानें व विचारानें उपयोग केला तर त्याच्या पासून मनुष्याला पुष्कळ चांगल्या गोष्टी करून घेतां येतात. कारण पैसा ही या जगांत एक मोठी शक्ति आहे.

( १८७ )

वाचाळपणा हा लघुत्व आणणारा आहे आणि मौन हें उन्नति देणारें आहे.

( १८८ )

कादंबऱ्या, नाटकें किंवा इतर किरकोळ मनोरंजक पुस्तकें यांनीं मनुष्याची खरी सुधारणा झालेली कधीं फारशी ऐकिवांत नाहीं. तीं कारंजाच्या तुषारांप्रमाणें वर वर सिंचन करणारीं असतात.

( १८९ )

कोणतीही गोष्ट युक्त आहे कीं अयुक्त आहे याचा विचार करून शहाण्या मनुष्यानें धोरण ठेवून बोलत असावें.

( १९० )

वाचनानें मनुष्य बहुश्रुत होतो, लिहिण्यानें ठाकठिकी येते, आणि संभाषणानें समयसूचकता येते.

( १९१ )

किती जरी कडक उन्ह लागलें तरी वाईट झाडाच्या छायेखालीं बसून विसांवा घेऊं नये.

( १९२ )

पौरुष केल्यावांचून जी आयतीच प्राप्त झालेली संपत्ति तींत काय अर्थ आहे ? ह्मातारा झालेला बैल देखील यदृच्छेनें उगवलेलें गवत भक्षण करितो.

( १९३ )

शहाणा वैद्य तोच होय कीं, जो बाह्य विकारांकडे अणुमात्रही लक्ष न देतां रोगबीजांचें उन्मूलन करण्याकडे आपलें चातुर्य खर्च करितो.

( १९४ )

प्रेमासारखें गुढ दुसरें कशांत नाहीं. प्रणयी मनुष्यास वाईटाचें चांगलें व चांगल्याचें वाईट दिसतें.

( १९५ )

विकाराचा जय कधींच होत नाहीं. विचाराचाच जय शेवटीं होतो. कारण विकाराचें साम्राज्य चालूं असेपर्यंत तें कितीही प्रबल दिसलें तरी त्यांत चिरस्थाईपणा मुळींच नसतो.

( १९६ )

राजा असो रंक असो; घड्याळाच्या कांट्यांप्रमाणें दैवगती सगळ्यांचीच फिरते.

( १९७ )

सच्छील मनुष्य किती जरी तृषाक्रांत झाला असला तरी तो दुष्टाच्या झऱ्यावर कधींही पाणी पिणार नाहीं.

( १९८ )

दुसऱ्याचा मागून आणलेला कपडा आपल्या आंगाला कधींच बरोबर बसत नाहीं.

( १९९ )

हल्लींच्या काळाला सायन्टिफिक् एज् ( शास्त्रीय युग ) अशी संज्ञा आहे. या कालांत शास्त्रीय विषयांत गर्क होऊन गेलेल्या लोकांचा सर्व वेळ भूमिगत वस्तूंचें निरीक्षण करण्यांत जात असल्यामुळें त्यांस वर आकाशाकडे ( परमेश्वराकडे) दृष्टि फेंकण्यास वेळच होत नाहीं.

( २०० )

सगळीं औषधें जाहिरातीप्रमाणें गुण देतात असें मुळींच नाहीं. जाहिरात विक्रीसाठीं आहे, गुणासाठीं मुळींच नाहीं.

( २०१ )

जो जलद शिकतो तो जलद विसरतो. ज्या नदीचें पाणी लवकर चढतें तिचें पाणी लवकर ओसरतें.

( २०२ )

रुळलेल्या मार्गानींच चालावयाचें, नवीन सुधारणांना प्रतिरोध करावयाचा आणि आळशीपणानें राहून मनोराज्य करावयाचें एवढेंच काय तें रूढीबद्ध व धर्मभोळ्या लोकांस ठाऊक असतें.

( २०३ )

कोणतेंही एखादें कृत्य होऊन गेलें ह्मणजे त्याबद्दल

युक्त्या व शकला मागून काढीत बसण्याची व पाठी-मागून आपल्या बुद्धिबळाचें डाव टाकीत बसण्याची मूर्ख लोकांना फार संवय असते.

( २०४ )

ज्यांच्या बुद्धिमत्तेला कर्तृत्वशक्तीची जोड नाहीं तीं माणसें बुद्धिमान् असूनही निरुपयोगी होत.

( २०५ )

शिक्षण हें मानसिक उन्नतिचें आदिकारण असून मानसिक उन्नति ही स्वातंत्र्याचें बीज होय.

( २०६ )

मर्यादा हें एक सोन्याचें कोंदण होय. त्यांत पुरुष-ही शोभतात व बायकाही शोभतात. पण स्त्री विशेष शोभते.

( २०७ )

पश्चात्ताप होणें हा तरी एक सद्गुणच म्हणावयाचा, कारण अनुतापानें कित्येक लोक सन्मार्गाला लागलेले आढळून येतात.

( २०८ )

दुसऱ्यावर तोंड टाकून बोलण्याची संवय फार वाईट आहे. कारण तसें तोंड ह्मणजे अपकीर्तीचें ढोल होय.

( २०९ )

स्वतःचे विचार व स्वतःचीं मतें यांस झुगारून दे-ऊन दुसऱ्याच्या तंत्रानें लोकप्रतिनिधीचा मान मिळ-विण्यापेक्षां स्वतंत्र मताचा एक नागरिक ह्मणून खा-जगी रीतीनें दिवस काढलेले फार उत्तम.

(२१०)

स्वच्छता हें लक्ष्मीचें घर आहे. व ती राखण्यांत आरोग्याचें पोषण आहे.

(२११)

लक्ष्मी लंगडत येते व जाते वेळीं धूम ठोकीत जाते. ह्मणजे पैसा मिळवायाला मनस्वी कष्ट पडतात पण घालवायाला एक क्षणही लागत नाहीं.

(२१२)

बाल्यावस्था हा एक लहानसा झुळझुळ वाहणारा जलप्रवाह आहे. त्याला जसें वळण लावावें तसा तो वाहतो.

(२१३)

आशा ही मोठी बलवत्तर आहे. ही नेट व हिंमत यांची जननी आहे व दरिद्री मनुष्याची लक्ष्मी आहे.

(२१४)

मनुष्य संकटाच्या तडाक्यांत सांपडला ह्मणजे मग परमेश्वर आहे असें मानून त्याचा धांवा करूं लागतो. नाहीं तर तोपर्यंत त्याच्या अस्तित्वाबद्दल नुसता तो वादविवादच करीत असतो.

(२१५)

आपली आहे ती स्थिति फार सुखाची असें मानून जे लोक या संसारांत आनंदानें कालक्रपणा करितात ते फार करून पश्चात्तापांत कधीं पडत नाहींत.

(२१६)

काव्य हें षड्रसांचें जीवन, स्फूर्तीचें धाम आणि सरस्वतीचें केवळ मंगल स्थानच होय.

(२१७)

वेळ ही पैशापेक्षां अधिक मौल्यवान् आहे. आणि व्यापाराच्या कामांत वेळ हाच पैसा आहे.

(२१८)

श्रीमंत व थोर लोकांच्या अद्वातद्वा वडबडण्याला वक्तृत्व ह्मणतात. आणि गरीबाच्या चांगल्या भाषणाला वाचाळपणा ह्मणतात; तेव्हां हा सर्व प्रभाव एका लक्ष्मीचा होय.

(२१९)

प्रत्येक मनुष्य प्रथम भेटीला चांगला दिसतो. पण त्याला पुरा कसाला लाविला असतां त्याच्यामध्यें हिणकस भाग किती आहे हें चट्कन् कळून येतें.

(२२०)

अंतःकरणांतील उच्च मनोवृत्तींची वाढ खुंटविणारी स्वार्थबुद्धि ही तरी एक कीडच समजावयाची.

(२२१)

राष्ट्राची संपत्ति कोणत्या उपायांनीं वाढते किंवा ऱ्हास पावते, हें ज्याच्या योगें समजतें, त्यास अर्थशास्त्र किंवा संपत्तिशास्त्र अशी संज्ञा आहे.

(२२२)

ज्यांचें कुलशील चांगलें नाहीं व ज्यांच्या मनाला कधीं चांगला संस्कार झालेला नाहीं अशांच्या हातीं अधिकार किंवा सत्ता येणें ह्मणजे लोकांचें मोठेंच दुर्दैव होय.

( २२३ )

श्रीमंतीला शोभा औदार्यानें येते; पण औदार्याला शोभा आणणारें चिरस्थायी पुण्यकृत्य होय.

( २२४ )

ज्यांच्या बद्दल आपण फार आशावंत राहतों, तेच आपली शेवटीं निराशा करण्यास कारणीभूत होतात.

( २२५ )

दारिद्र्य, अज्ञान व आरोग्य विघातक परिस्थिति हीं तीन मोठीं भयंकर अरिष्टें होत. त्यांचें निवारण होईल तेवढ्या जलद उपायांनीं करणें यांतच खरें शहाणपण आहे.

( २२६ )

सुशिक्षित माणसें कधीं कधीं जीं असत्पक्षास धरून राहतात त्यास कारण त्यांच्या कोणत्या तरी सद्गुणाचा प्रभाव असतो.

( २२७ )

मृगजळाची शोभा दुरूनच मोठ्या गमतीची दिसते. डोंगर लांबूनच मोठे रमणीय दिसतात; त्याप्रमाणें कित्येक मनुष्येंही पण बाहेरूनच चांगलीं दिसतात.

( २२८ )

ज्यांना गुणाची काडीचीही परीक्षा नाहीं त्या लोकांना त्यांच्या शेजारीं केवढाही महागुणी मनुष्य असला तरी त्याची किंमत काय वाटणार आहे? तळ्यांतील बेडकांना कमलांतील मधु प्राशन करणाऱ्या भ्रमराची योग्यता कशी कळणार?

( २२९ )

वाचन हा सन्मित्र, वाचन हा सद्गुरु, वाचन हा करमणूककर्ता व विश्रांति दाता सखा होय. या साठीं प्रत्येक विवेकी मनुष्यानें वाचनाचा व्यासंग होईल ते-वढा जास्त करीत जावा.

( २३० )

सर्व तृष्णांत धन व राज्यतृष्णा या फार घातुक आहेत. त्यांचें स्वरूप परिमित स्थितींत असलें तरच बरें; नाहीं तर त्या अमर्याद होऊन शेवटीं नाशास का-रण होतात.

( २३१ )

कृतज्ञता हा गुण इतर गुणांप्रमाणें सुशिक्षणावरोवर वाढत असतो.

( २३२ )

सहानुभूति उत्पन्न करण्याचे कामीं तारायंत्रापेक्षांही हृदय हें एक अद्भुत यंत्र आहे.

( २३३ )

आपल्या संग्रहीं एक चाकर निरंतर ठेवण्यास आधीं मनुष्यास दुसऱ्याचें चाकर व्हावें लागतें.

( २३४ )

आदा व खर्च काय आहे याकडे ज्याची दृष्टि अ-गदीं बारीक आहे तो माणूस आज नाहीं उद्यां श्रीमंत झाल्याशिवाय खास रहावयाचा नाहीं.

( २३५ )

श्रीमंतांनीं मन मानेल तितक्या वेळां खावें आणि गरिबांनीं मिळेल तेव्हां खावें.

( २३६ )

व्यायाम व मोकळी हवा हीं शरिरास सुखकर होतात त्याप्रमाणें मानसिक श्रम व स्वतंत्र विचार हे मनाला सुखकर होतात.

( २३७ )

विवाद व विवाह हे आपल्या बरोबरीच्या माणसाशीं करणें अत्यंत इष्ट आहे.

( २३८ )

मनाची स्थिति चांगली असली ह्मणजे शरीर सशक्त राहून तोंडावर सुरेख तेज असतें व तो मनुष्य बहुधा निरोगी असतो.

( २३९ )

जेथें शक्तीचा उपयोग करितां येत नाहीं त्या ठिकाणीं युक्तीनें व धोरणानें काम करून घ्यावें.

( २४० )

आळस ही एक अंधारकोठडी होय. आळशी माणसाला ज्ञानरवीच्या तेजोमय प्रकाशाचें एक किरणही कधीं त्याच्या साऱ्या आयुष्यांत दृष्टीस पडत नाहीं.

( २४१ )

विद्या हें विद्वानांचें द्रव्य होय. व नम्रता हा त्यांचा अलंकार होय.

( २४२ )

पैशानें भरलेल्या पिशवीपेक्षां दयेनें भरलेल्या हृदयाची किंमत अधिक आहे.

( २४३ )

मैत्री शहाण्या व विचारवंत माणसाबरोबर करावी;

शरीरसंबंध कुलवान् व सुशील माणसाबरोबर करावा; व व्यवहार प्रामाणिक व सचोटीच्या माणसाबरोबर करावा. म्हणजे त्यापासून उभयतांसही सुख होतें.

( २४४ )

राजरस्ता सांपडल्यावर विकट व आड मार्गानें जाऊं नये.

( २४५ )

थोरांचें मन संपत्तीच्या वेळीं नवनीताहूनही मृदु असतें; व संकटकाळीं दगडाप्रमाणें कठिण होतें.

( २४६ )

मननाखेरीज वाचन व्यर्थ होय. मनन केलें नाहीं व आपलें स्वतःचें मत ठरविलें नाहीं तर दुसऱ्याच्या विचारांचें व मतांचें भारवाहकत्व तेवढें पदरीं येतें.

( २४७ )

सोनें तापविलें असतां व मणि घांसला असतां त्यांना तेज चढतें. तद्वतच सत्पुरुषांना तापत्रयांनीं गांजिलें असतां ते उज्वल होतात.

( २४८ )

विचारी माणूस सहसा कधीं अडत नाहीं व चुकतही नाहीं. कारण सर्व प्रसंगीं त्यास जागृत करणारा व प्रसंगीं योग्य सल्ला देणारा विवेक त्याच्या जवळ नेहमीं हजर असतो.

( २४९ )

कित्येकांस असें वाटतें कीं, सन्मार्गानें वागणें हें फार बिकट व त्रासदायक आहे. आणि कुमार्गानें वागणें हें फार सोपें व सुखाचें आहे. पण ज्यांना चांगलें शि-

क्षण मिळालेलें आहे त्यांना सन्मार्गानें वागणें हेंच सुखाचें व सुलभ वाटतें.

( २५० )

वरेच लोक लहानपणीं मोठे हुषार व तरतरीत बुद्धीचे असतात; पण पुढें ते मोठे झाल्यावर उद्योग, सद्वर्तन व आरोग्य यांच्या अभावामुळें अगदीं कुचकामाचे होऊन जातात.

( २५१ )

सत्यान्वेषणाचे कामीं लागणारा प्रामाणिकपणा अगर मनाचा निरभिमानपणा सर्वांच्याच ठिकाणीं सारख्या प्रमाणानें वास करितो असें नाहीं.

( २५२ )

कोणतीही कमी योग्यतेची वस्तु प्रेमाच्या बंधनानें उच्च प्रतीची ठरते.

( २५३ )

अति कोप, निष्ठुर भाषण, सज्जनांशीं वैर, दारिद्र्य, नीच संगति, व हलक्या कुळांत जन्म या गोष्टी हतभाग्यपणाचीं लक्षणें होत.

( २५४ )

मनुष्यस्वभावाचा असा कांहीं चमत्कार आहे कीं, जी गोष्ट अनायासें मुबलक प्राप्त झालेली असते तिची किंमत त्यास मुळींच वाटत नाहीं.

( २५५ )

राष्ट्रास मोठेपण चांगल्या आईबापांनीं प्राप्त होतें.

( २५६ )

भावना पवित्र व तेजस्वी असावी. पवित्र भावनेनें

ईश्वर, धर्म, नीति यांविषयींचे विचार प्रेममय व शुद्ध असतात.

( २५७ )

धर्म, नीति, न्याय व चतुर मंत्री हे चार राज्याचे आधारस्तंभ होत.

( २५८ )

भाषा हा राष्ट्रीय प्रगतीचा आरसा आहे. कोणत्याही देशाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष यांचें प्रतिबिंब त्यांत उत्कृष्ट रीतीचें दृष्टोत्पत्तीस येतें.

( २५९ )

परिस्थितीचा सर्व रंग बदलून टाकून तिला आपल्या मनाप्रमाणें वळण देणें हें काम अलौकिक कर्तबगारीच्या माणसाशिवाय इतरांस साधणें फार कठिण आहे.

( २६० )

स्थानिक स्वराज्य ह्मणजे राजकीय शिक्षणाची प्राथमिक शाळा होय.

( २६१ )

शील ह्मणजे संवयींचा संयुक्त परिणाम; आणि संवय ह्मणजे जीं कृत्यें मनुष्य नेहमीं करितो त्यांचें सार.

( २६२ )

राजसत्ता हा ईश्वरी अंश आहे. सगळें विश्व ईश्वरेच्छेनुरूप चालतें. त्याप्रमाणें राष्ट्र स्वप्रभूच्या इच्छेनुरूप चालतें.

( २६३ )

अनेक मनुष्यांच्या संयोगानें झालेल्या वस्तूस कु-

टुंब, कुटुंबसंयोगास समाज व समाजसंयोगास राष्ट्र असें ह्मणावें.

( २६४ )

मनुष्य प्राणी ज्या गोष्टींचें चिंतन करितो त्याप्रमाणें तो बनतो.

( २६५ )

शिक्षणाच्या बाबतींत मुलांना स्वभावतःच ज्याची आवड असते असे विषय शिकविल्यानें त्यांच्या बुद्धी-चा चांगला विकास होऊन त्यांच्या अमोलिक कालाचा अपव्यय केल्याचा दोष येत नाहीं.

( २६६ )

नशिबानें पुष्कळ दिलें तरी त्यापासून संतोष होणें हें मात्र मनाच्या स्वाधीन आहे.

( २६७ )

मनुष्य गोडीगुलाबीनें जें कांहीं करील तें जुलमानें करणार नाहीं. आणि केव्हां झालें तरी मनुष्यावर सक्ति न करितां त्याला खुष ठेवूनच त्याजकडून काम करून घ्यावें.

( २६८ )

खेळ चालत असतां खेळणारांपेक्षां बाहेर उभे असलेल्या लोकांसच खेळ चांगला दिसतो.

( २६९ )

रागावलेल्या मनुष्याचा राग मृदु उत्तरानें शांत होतो.

( २७० )

एखाद्या मनुष्याविषयीं मनांत कांहीं संशय आ-

त्यास त्याला कामावर लावूं नये. व ज्याला कामावर लाविला त्याच्या विषयीं संशयखोर असूं नये.

( २७१ )

ज्या मनुष्याला चांगलें भाषण करण्याची अक्कल नाहीं व मौन केव्हां धारण करावें हें समजण्याचें तारतम्य नाहीं तो मोठा अभागी होय.

( २७२ )

मनुष्याच्या वर्तनास व्यवस्थितपणा हा आधार, भूतदया ही मार्गदर्शक, व प्रगति हा साध्य हेतु असला पाहिजे.

( २७३ )

मन आनंदी असलें ह्मणजे मनुष्यास लौकर थकवा येत नाहीं. व त्याच्या आंगीं पुष्कळ उपयुक्त कामें करण्याचा उत्साह राहतो. पण उदास वृत्तीचा मनुष्य केव्हांच थकून जातो.

( २७४ )

मनुष्याच्या ज्या प्रकारच्या संवयी असतात तसा त्याचा स्वभाव बनतो; आणि स्वभावाप्रमाणें त्याची भवितव्यता बनते.

( २७५ )

मनुष्याच्या तापट स्वभावावरून त्याची मानसिक दुर्बलता व आत्मदमनाचा अभाव हीं दिसून येतात. आणि शांत स्वभावावरून त्याची मानसिक दृढता चांगली दिसून येते.

( २७६ )

खोट्यानाट्या युक्तीनें मिळविलेली स्थिति जरी बा-

ह्मतः प्रगति अशी भासली तथापि वास्तविक रीतीनें ती एक प्रकारची पिछेहाटच समजावी.

( २७७ )

ज्या मनुष्याचें लक्ष्य श्रेष्ठ व उदात्त कल्पनांकडे जात नाहीं त्याच्या मनांत नेहमीं नीच कल्पनाच येतात असें समजावें.

( २७८ )

सोन्यासारख्या कृतींनींच सोन्यासारखे दिवस येतात.

( २७९ )

आश्चर्य ह्मणजे तें होय कीं, जें मनुष्यानें कधींही पाहिलेलें नसतें किंवा अपूर्व असतें अथवा अकस्मात् मनुष्याच्या दृष्टीस पडतें. ह्मणजे सामान्य व्यवहारांत मनुष्याला ज्याचा प्रत्यय येत नाहीं तें आश्चर्य होय.

( २८० )

जो हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागतो त्याच्या हातची वस्तु जाते आणि पळणारी वस्तु मिळत नाहीं ती नाहींच.

( २८१ )

योग्य समयाची वाट कशी पहावी हें ज्यांना समजतें त्यांना सर्व कांहीं साध्य होतें.

( २८२ )

आज्ञा कशी पाळावी हें प्रथम शिकलें पाहिजे. ह्मणजे दुसऱ्यावर अंमल करण्याचें काम सहज करितां येतें.

( २८३ )

अधिकार प्राप्त झाला म्हणजे त्या मानानें जबाबदारीही उत्पन्न होते.

( २८४ )

मर्यादितपणा हा गुण शक्तीचा सूचक आहे. कारण मर्यादितपणा आत्मनिग्रह असल्यावांचून संभवत नाहीं. आणि आत्म्याचा निग्रह करण्यास आंगीं लोकोत्तर शक्ति लागते.

( २८५ )

क्रोध, द्वेष, चिंता, दुःख, भय, इत्यादि मनोविकार जीवनकलेला अपायकारक होतं.

( २८६ )

श्रम नियमानें व धिमेपणानें करावेत, एकसारखे करून उपयोगाचें नाहीं. कारण श्रम केल्यापासून जीवास सुख झालें पाहिजे.

( २८७ )

दरिद्रावस्थेंत जन्म झालेला पतकरेल; पण अज्ञान दशेंत आयुष्य घालविणें म्हणजे मोठें दुर्दैव होय.

( २८८ )

ज्यांना शाळेंत नांव लौकिक मिळवितां आला नाहीं त्यांनीं निराश होण्याचें कारण नाहीं. कारण विशाल बुद्धीची परिपक्वता लहान वयांतच होते असें नाहीं.

( २८९ )

खरें पाहिलें असतां जगांत क्षुद्र वस्तु मुळींच नाहींत. क्षुद्र मनें मात्र पुष्कळ आहेत.

( २९० )

मनुष्य गरीब स्थितींत असला तरी त्यानें दुःख मानण्याचें कारण नाहीं; कारण पुष्कळ सर्वमान्य लोक दरिद्रावस्थेंत असूनही फार सुखी व सौजन्ययुक्त होते.

( २९१ )

जगामध्यें दुर्लभ आणि अशक्य असें कांहीं नाहीं. प्रयत्नांनीं सर्व कांहीं साध्य होतें. मात्र हिंमत धरून यावज्जीव प्रयत्न करण्यांत कधींही कसूर करूं नये.

( २९२ )

चांगल्या लोकांशीं स्नेह केल्यानें कीर्ति वाढते व कुल उच्च प्रतीला जातें. आणि अधम लोकांशीं स्नेह केला ह्मणजे जगांत अपकीर्ति होऊन कुल अधम द-शेला जातें.

( २९३ )

ज्याच्या डोक्यावरील केंस पिकले तो वृद्ध नव्हे. वयानें लहान असूनही जो विद्येनें मोठा तो वृद्ध होय.

( २९४ )

दुसऱ्याची संपत्ति पाहून मनुष्यानें खेद मानूं नये. त्याला त्याच्या खऱ्या प्रयत्नानें जें काय मिळेल त्यावर त्यानें संतोषानें रहावें.

( २९५ )

संपत्ति असून दानाची इच्छा असणें हें अल्प त-पाचें फल नव्हे.

( २९६ )

तारुण्यामध्यें जो शांत राहील तो खरा शांतिमान् म्हणावा. शक्ति क्षीण झाल्यावर कोण शांत होत नाहीं?

( २९७ )

संकट जोंपर्यंत आलें नाहीं तोंपर्यंतच त्याची भीति बाळगावी. पण तें एकदां आलें म्हणजे धैर्य धरून त्याशीं टक्कर देणें हेंच उचित होय.

( २९८ )

दुष्ट व मूर्ख लोकांची मैत्री करूं नये हें जरी खरें आहे, तथापि तशा लोकांचें वैरही संपादितां कामां नये; कारण जगांत त्या लोकांची संख्या फार आहे.

( २९९ )

सध्यः परिस्थितींतून पुढचा प्रगतीचा मार्ग आक्रमण करण्यास काल अनुकूल असतांही जर दिरंगाई केली तर त्याच्या सारखा आत्मघातकी दुसरा कोणीच नाहीं.

( ३०० )

उच्च हेतूनें प्रेरित होऊन प्रामाणिकपणानें, कर्तव्य-दक्षतेनें व व्यवस्थितपणें कोणत्याही सत्कृत्याला हात घातला असतां त्यांत परमेश्वर यश दिल्याखेरीज खात्रीनें रहात नाहीं.

---



यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

भगवद्गीता.